






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






महाराष्ट्र–साहित्य–परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

वर्ष २८ वें, अंक ११२ ] [ जाने.–फेब्रु.–मार्च १९५५

# ११२

## अ नु क्र म णि का



**परीक्षणें**

शं. गो. तुळपुळे, दा. ग. लोंढे, भ. श्री. पंडित, मा. गो. देशमुख, द. रा. गोमकाळे, वि. भि. कोलते व 'काश्यप'.

याशिवाय मराठीविषये नगरीं, परिषद् वार्ता, साभार स्वीकार, नवीन सभासद, वार्षिक इतिवृत्त, हिशेबपत्रकें इत्यादि

---

संपादक

विष्णु भिकाजी कोलते

संपादक-मंडळ

के. ना. वाटवे शं. के. कानेटकर

सरोजिनी बाबर म. ना. अदवंत



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

येथे वाचायें तोषावें
महाराष्ट्र साहित्य परिषद

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणें २

## कार्यकारी मंडळ (१९५५–५८)

| | |
|---|---|
| १ प्रा. चिं. वि. जोशी, | कार्याध्यक्ष. |
| २ श्री. चिं. ग. कर्वे, | खजिनदार. |
| ३ प्रा. वा. दा. गोखले | चिटणीस. |
| ४ प्रा. अ. गं. मंगरूळकर | |
| ५ श्री. बा. रं. सुंठणकर | |
| ६ श्री. वा. रा. ढवळे, | संपादक 'पत्रिका'. |
| ७ डॉ. अ. ना. भालेराव. | |
| ८ श्री. श्री. शं. नवरे. | |
| ९ डॉ. शं. दा. पेंडसे. | |
| १० प्रा. रा. श्री. जोग. | |
| ११ श्री. य. दि. पेंढरकर. | |
| १२ प्रा. श्री. के. क्षीरसागर. | |
| १३ श्री. शं. गो. पटवर्धन. | |
| १४ डॉ. रा. शं. वाळिंबे. | स्वीकृत. |
| १५ श्री. न. शे. पोहनेरकर | |

---

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र
# साहित्य - पत्रिका

वर्ष २८ वें, अंक ११२ ] [ जानेवारी-फेब्रुवारी-मार्च

# ११२

## ठिणगी : : यशवन्त

भल्या पहाटेची वेळ
होतों पेटवीत चूल
उठे निखाऱ्यांतून तों
ठिणग्यांची भुतावळ
एक ठिणगी त्यांतली
ताडकन तडकली
आणि शिरीं केसांमाजी
शीघ्र जाऊन दडली
भय कसलें ? तथापि-
जरा झटकले केस
उरकून चहापाणी
गेलों ऐटींत स्नानास
शिरीं ओतून संपलें
हौदाएव्हढें घंगाळ
जीविताच्या उन्हाळ्यांत
हाच एवढा सुकाळ
असो. करून आंघोळ
पुसूनिया केशभार
भांग पाडिला सुंदर
विंचरून वारंवार

शुभ सुंदर सकाळ
फिरावया रम्य वेळ
गावाबाहेर वाहतें
चैतन्याची झुळझुळ
मनीं फिरतां ही कळ
ओलांडून गल्ली बोळ
आलों गावाबाहेरील
खुल्या मैदानीं शीतळ
मंद मधुर पवन
कुजबुजला कानांशीं
किती लाडिकपणानें
कुरवाळून मजशीं
तोंच शिरीं प्रातःकाळीं
उडूनिया पडलेली
पेट घेई ती ठिणगी
क्षणीं भडकली होळी
डोक्यामधूनिया ज्वाळा
रोमरोमांतून ज्वाळा
भडकल्या आणि त्यांनी
ग्रासियली रम्य वेळा

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

## १ ‘नवकाव्य’ म्हणजे काय ? : : माधव गोपाळ देशमुख.

कोणत्याहि नवीन वाङ्मयप्रकाराविषयी कांही मूल्यमापनात्मक वा समालोचनात्मक लिहावयाचें असल्यास त्याबाबत त्या वाङ्मयप्रकाराच्या निर्मात्यांचें मत प्रमाण समजावयास हरकत नसावी. मराठींत पूर्वकवींपेक्षा कांहीं स्वतंत्र व वेगळया प्रकारची रचना प्रथमतः ज्ञानेश्वरांनी केली. संस्कृतांतील काव्यापेक्षा आपलें काव्य हें केवळ भाषेच्याच नव्हे तर आशयाच्या व अंतर्गत रसभावांच्या दृष्टीनेहि निराळें असून आपल्या काव्याचें प्रयोजन, प्रसाधन व कारण हे पूर्वकवींपेक्षा कोणकोणत्या बाबतींत वेगळें आहे हें त्यांनी ज्ञानेश्वरींत उपक्रमोपसंहारांत आणि प्रसंगोपात्त प्रतिमादिकांच्या द्वारें विशद करून ठेवलें आहे. स्थूलमानानें, ज्ञानेश्वरांनी घालून दिलेल्या मार्गानेच मोरोपंतापर्यंतच्या संतकवींनीं, विशेषेंकरून एकनाथ, तुकाराम, मुक्तेश्वर, वामन, रामदास, श्रीधर व मोरोपंत यांनी, आपल्या काव्याचें ध्येय आणि अन्तःप्रवृत्ति यांविषयीं जें जें कांही आपापल्या कृतींतच लिहून ठेवलें आहे त्यावरून व त्यांच्या कृतींचा आस्वाद घेणाऱ्या रसिकांच्या अभिप्रायांवरून मोरोपंत कवि होऊन गेल्यानंतर बऱ्याच वर्षांनी या सहाशें वर्षांतील मराठी कवितेविषयीं कांही टीकात्मक मूल्यें स्थिर झालीं व त्यांच्या वैशिष्टयपूर्ण कवितेला ‘संतकाव्य’ असें नांव दिलें गेलें. ‘संतकवि’ वा ‘भक्तकवि’ या नांवाविषयी आक्षेप घेणारा टीकाकार आजहि एखादा दुसरा सापडेल; नाहो असें नाही. पण स्थूलमानाने का होईना ‘संतकवि’ हें नांव निदान या काळांतील कांही निवडक कवींना दिल्यास तें वावगें ठरत नाही.

‘निजहृदि विकसन्त: सन्ति सन्तः कियन्तः ?’ या न्यायाने जगांत सज्जनांची—संतांची संख्या कमी असली तरी वरील पांचसहाशें वर्षांच्या कालावधींत जे कांही थोडे संत असलेले कवि होऊन गेले त्यांच्या काव्यप्रकाराला ‘संतकाव्य’ हें नामाभिधान केव्हा व कसें दिलें गेलें हें पाहिलें पाहिजे. एखाद्या वाङ्मयप्रकारांतील संप्रदायाचें नामकरण होण्यासाठी कांही कालावधि लोटल्याशिवाय तें स्थिर होऊं शकत नाही आणि जें नांव स्थिर होतें त्यांत त्या संप्रदायाचीं सर्व वैशिष्टयें निर्विवाद रीतीने व सामग्र्याने दिसून येणें अवश्य असतें. संत हा शब्द वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणावरून मराठींत रूढ झाला. संस्कृतांत हा शब्द पुल्लिंगी बहुवचनीं विशेषण आहे. मराठींत मात्र ‘संत’ हें एकवचनी नाम झालें. ‘संत’ शब्दाचा अर्थहि संस्कृताच्या अपेक्षेने थोडा निराळा झाला. पण ‘संतकवि’ म्हणजे काय व संतकवि कोण याबद्दल कांही प्रश्न निर्माण होतांना दिसत नाही. शांत व भक्ति या रसभावांचा प्रकर्ष ज्यांच्या काव्यांत आढळतो त्यांना ‘संतकवि’ हें नांव चपखल रीतीने जमून गेलें.

मोरोपंतानंतर शाहिरी कवितेचा कालखंड सोडल्यास पूर्व कवितेचें स्वरूप सर्वस्वीं बदलवून टाकणारा पहिला युगप्रवर्तक कवि ‘केशवसुत’ होय. संतकवितेपेक्षा केशवसुतांच्या संप्रदायाचीं कोणतीं वैशिष्टयें वेगळीं ठरतात याची सतत चर्चा होऊन तीं वैशिष्टयें आज स्थूलमानाने निश्चित झालेलीं असलीं तरी प्रामुख्याने केशवसुतांनी प्रचलित केलेल्या काव्यसंप्रदायाला एखादें नांव निश्चित करण्याचा काळ टीकेच्या क्षेत्रांत अद्याप निर्माण व्हावयाचा आहे. याचें एक कारण केशवसुतांचा संप्रदाय अद्याप थांबला नाही हें तर आहेच. कारण त्यांच्याच संप्रदायाची बहुतेक सर्व बिरुदावली अभिमानाने मिरविणारे यशवंत, गिरीश, अनिल, कुसुमाग्रज

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

यांसारखे ख्यातनाम कवि आजहि विद्यमान असून त्यांचा काव्यौघ खंडित झालेला नाही. दुसरें म्हणजे काळाचीं पावलें पांचसहाशें वर्षांइतकीं लांब असतात. लांब कशाला, ज्ञानेश्वर ते मोरोपंत या कालखंडांतील कवींना 'संतकवि' हें नांव केव्हा दिलें गेलें याकडे लक्ष्य दिलें तर केशवसुतांच्या संप्रदायाला एखादें निश्चित नांव केव्हा स्थिर होईल याचा कयास करणें जड जाऊं नये.

श्रेष्ठ कलाकृतींचें यथार्थ मूल्यमापन होण्यासाठी त्यांचें सम्यक् दर्शन (Perspective) घडावें लागतें. एखादें चित्र अवलोकण्यासाठी जसें विशिष्ट दूरान्तरावर जावें लागतें त्याप्रमाणे काव्याचें आलोचन करण्यासाठीहि कालान्तर होणें अवश्य असतें.

केशवसुतांचा संप्रदाय आता गतार्थ वा इतिहासजमा झाला आहे असेंहि जेथे यथार्थतेने म्हणतां येत नाही तेथे त्याला त्याचें वैशिष्ट्य व्यक्त करणारें नांव आजच देण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही. याच दृष्टीने केशवसुतपूर्वकालीन कवितेला प्राचीन, व केशवसुतापासूनच्या कवितेला त्याच्या अपेक्षेने अर्वाचीन वा आधुनिक मराठी कविता हें नांव देण्यांत येतें. वस्तुतः अर्वाचीन वा आधुनिक हे शब्द सापेक्ष आहेत; परंतु प्रत्येकच कवि त्याच्या त्याच्या काळांत आधुनिक असतो या दृष्टीने हें नांव निरुपद्रवी व वादातीत आहे.

गेल्या कांही वर्षांत भारताच्या व त्यामुळे महाराष्ट्राच्या राजकारणांत अशी कांही उलथापालथ झाली की तिचा परिणाम वाङ्मयकारणावरहि झाल्याशिवाय राहिला नाही. देशाच्या स्वातंत्र्याच्या उषःकालांत सर्वच गोष्टी नव्या दिसल्या तर त्यांत कांही नवल नाही. परंतु मराठी टीकाकारांतील कांही उत्साही नव तरुणांनीहि एक नवी टूम काढली व विद्यमान कवींपैकी कांही कवि वेगळे काढून त्यांना 'नवकवि' म्हणावयास सुरुवात केली. कोणता विद्यमान कवि कोणत्या काळांत 'नव' नसतो ? 'त एव पदविन्यासास्त एवार्थविभूतयः । तथापि काव्यं भवति नव्यं ग्रथनकौशलात्' या वचनानुसार शब्दार्थ तेच असूनहि केवळ रचनाकौशल्यामुळे (प्रत्येकच) काव्य 'नव्य' होतें, या साध्या तत्त्वाकडे आमच्या विचारवंतांचेंहि दुर्लक्ष्य झालें आणि विद्यमान कवींपैकी ज्यांना 'नवकवि' म्हटलें गेलें नाही त्यांनी नवकवींचें मानवतावादी उर्फ आशावादी आणि यंत्रवादी उर्फ वैफल्यवादी असे दोन प्रकार पाडून सर्वच विद्यमान कवींना 'नवकवि' या व्यापक नांवाखालीं आणण्याचा उपक्रम केला. कांही कवि तर बिचारे एका सुंदर सकाळीं झोपेंतून उठले आणि त्यांच्या लक्ष्यांत (आणून देण्यांत) आलें की 'आपण नवकवि आहों !' आधी 'नवकवि' हें नांव एकदा निश्चित केलें व मग लगेच नवकाव्यांतील भाषा, नवकाव्यांतील प्रतिमायोजना, नवकाव्यांतील गुणदोष इतकेंच काय पण नवकाव्याचें मानसशास्त्र देखील ठरलें. त्याबरहुकूम नवी नवी कविता तयारहि होऊं लागली ! ज्यांना तथाकथित नवकाव्याच्या कोणत्याहि प्रकारांत मोडतां आलें नाही त्यांना कांहीशी खंत वाटून त्यांनी आपलें एखादें तरी 'नवकाव्य' असावें म्हणून कोठे मुक्तच्छंद जुळव, कोठे बीभत्सच लिही, कोठे मध्येच इंग्रजी शब्द घाल तर कोठे कांही तरी अघटित, विचित्र, दुर्बोध असें लिहून ठेव असें करतां करतां या नवकाव्यांत भरच पडत गेली.

टीकाकार मित्रांनी ज्यांची नवकवींत भरती केली त्यांना 'तुम्ही नवकवि आहां का ?' असा प्रश्न विचारल्यास त्यांपैकी कोणीहि कधी "माझा नवकाव्याचा बोलू कवतिकें । मादेरेशींहि पैजेसी जिंके" असे ज्ञानेश्वरांच्या चालीवर किंवा "आम्ही कोण म्हणून काय पुसतां ? आम्ही असों ते 'नव'" असे केशवसुती तऱ्हेने म्हटलें नाही ! उलट "आम्हांला नवकवि म्हणूं नका" असाच सूर अनेकदा त्यांच्या मुखावाटे बाहेर पडलेला ऐकूं आला. केवळ तथा-

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कथित नवकवींच्या रचनेकडे पाहिलें तरी त्यांतील बऱ्याच गद्यप्राय, सौंदर्यविहीन, वैरस्य-कारक आणि दुर्बोध पंक्तींना ' नवकाव्य ' म्हणण्याचा अट्टाहास कांही उत्साही टीकाकारांनी कां धरावा हें कळणें कठीण आहे ! एक तर ज्याला नवकाव्य म्हणावयाचें त्यांत काव्याचें एखादें तरी सर्वमान्य लक्षण नको का ? बरें तें आहे असें मानिलें, तरी ' नव ' म्हणण्या-साठी त्यांत कांही ना कांही नवेपणा, ताजेपणा नको का ? नव्याचा अन्वय नाही आणि जुन्याशीं व्यतिरेक नाही, अशा केवळ ' आधुनिक ' या कालवाचक अर्थानें नव शब्द वापर-ण्याचा आग्रह धरणें हें त्या शब्दाच्या भाषेंतील वापराशीं विसंगत आहे. ' राजहंस माझा निजला ' या गोविंदाग्रजांच्या प्रसिद्ध कवितेंत ' नवविधवा ' यांतील नव शब्दाची योजना चोखंदळ रसिकांना कशी खटकली याचें येथे स्मरण करून देणें आवश्यक वाटतें. जाणूनबुजून मनांत खोल रुजलेलीं दुःखें, अगतिकत्व, विफलता, आर्तता, कारुण्य, अशुभता, कुरूपता व वैरस्य हेंच ज्यांनी आपलें प्रतिपाद्य मानलें आहे, त्यांना ' नव ' हें शुभसूचक, ताजेपणाचें निदर्शक, टवटवीचें, नव्हाळीचें व उन्मेषशालिनी प्रज्ञेचें द्योतक असें विशेषण देऊन ' वदतो व्याघात ' कां करावा ? पूर्वसूरींनी प्रतिभेचें लक्षण करतांना, वस्तुनिर्माणक्षमतेला ' अपूर्व ' आणि उन्मेषशालितेला मात्र ' नव–नव ' हें द्विरुक्त विशेषण जोडलेलें आहे, यांत कांहीच का औचित्य नाही ?— की औचित्यभंग हेंहि नवकाव्याचें व त्यावरील नवटीकाकारांचें वैशिष्ट्यच समजावें लागणार आहे ?

आता जरा ' नवकाव्य ' लिहिणारे असे हे प्रमुख कवि कोण, याचाहि तपास काढूं. म्हणजे तरी ' नवकाव्या ' चा शोध वा बोध कदाचित् सुकर होईल. (१) श्री. मर्ढेकर यांचें बरेचसें काव्य सामान्यतः नवकाव्यांत जमा करतात. त्यांनी आपल्या Arts and Man या ग्रंथांत आणि कांही भाषणांत व लेखांत कलेच्या परिणामाची प्रक्रिया वर्णिली आहे. परंतु स्वतःच्या काव्यपंथाविषयी मात्र कांही निश्चित विवेचन केलेलें नाही. त्यांच्या कांही कवितांवर पाश्चात्य 'Modernism' च्या वळणाची छाप पडलेली असली तरी अनेक कविता साध्या व क्षुल्लक विषयांतून मोठा आशय काढण्याच्या केशवसुती प्रथेपेक्षा सर्वस्वीं वेगळ्या आहेत असें आजच विधान करणें धाडसाचें होईल. 'रांगोळी घातलेली पाहून' या गोविंदाग्रजांच्या कविते-प्रमाणे त्यांनीहि केशवसुतादिकांच्या कवितांतील श्रुतयोजनांचा विडंबनात्मक उपयोग केलेला आहे. मध्येच शुद्ध संस्कृत शब्द वा ओळी घालणाऱ्या मोरोपंती पद्धतीपेक्षा मर्ढेकरांची इंग्रजी शब्द पेरण्याची टूम कडवट विनोद खाचित उत्पन्न करते. परंतु केवळ तेवढ्यावरून तिला 'नव' म्हणणें उचित ठरेल काय ? प्रतिमासृष्टींत वेगळेपणा आहे व तो मर्ढेकरांचें काव्यनैपुण्य सुचवितो. तथापि प्रत्येक काळांत सभोवतालच्या परिस्थितीनुरूप व प्रतिपाद्य विषयानुरूप प्रत्येक संस्कारक्षम कवि त्याबाबत वेगळेपणा दाखवीतच असतो, ही कांही उदाहरणें देऊन सिद्ध करण्याची गोष्ट नाही. हेंहि अर्थात् एका किंवा कांही कवींचेंच वैशिष्ट्य आहे असें म्हणतां येत नाही. आणि त्यांत कांही 'नवता' तर नाहीच.(२) श्री. य. द. भावे यांचें 'हळवें भिंग' हें थोड्याच वर्षांत टीकाकारांच्याहि दृष्टीआड होऊन आजच दिसनासें झालें आहे. (३) श्री. पु. शि. रेगे यांच्यासारखी ध्वनिमधुर कविता कालिदास–भवभूतींच्या संस्कृतांत देखील क्वचितच आढळेल इतकी ती जुनाट असून तींत शृंगाररससूचकता व्यापून राहिली आहे; पण याचा अर्थ संस्कृतांत नसलेलें कांही अपूर्व अथवा 'नव' तत्त्व त्यांत आहे असा नाही. तर खुद्द अभिजात संस्कृतांतच जुनी होऊन गेलेली सातवाहन हालाच्या 'सत्तसई' कालीन अशी ती अतिप्राचीन पद्धति होय. तिला 'नव काव्य' म्हणणें म्हणजे नव शब्दाला नेमका उलट अर्थ देणें होय. शिवाय मर्ढेकरांच्या कांही कवितांत

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आढळून येणारी अभद्रता, बीभत्सता, वैफल्य इत्यादि वैशिष्ट्येंहि तींत अभावानेच जाणवतात, हेंहि तथाकथित नवकाव्यदृष्ट्या मोठेंच वैगुण्य होय. (४) श्री. आत्माराम रावजी देशपांडे उर्फ अनिल यांनाहि मानवतावादी अतएव 'नवकवि' संबोधण्याचा कांही टीकाकारांनी उपक्रम सुरू केला आहे. याबद्दल खुद्द 'अनिलां'स काय वाटत असेल तें असो. परंतु केशवसुत-संप्रदायांतील एवढ्या थोर कवीला 'नवकवि' म्हणावयाचें तर खुद्द केशवसुतांनाच त्या पदवीं-तून कां वगळावें, याचें उत्तर सापडत नाही ! त्यांची 'फुलवात' ही मात्र जीर्ण संप्रदायांतली व 'निर्वासित चीनी मुलास' आणि 'प्रेम आणि जीवन' ही नव संप्रदायांतील म्हणून देहली–दीप-न्यायाने त्यांचें दोहोंकडे स्थान दाखवावयाचें असा नव–टीकाकार दुहेरी डाव खेळतांना दिसतात. एकाच कवीच्या व्यक्तित्वांत नवे जुने असे दोन्ही पदर गुंफणाऱ्या अशा टीकाकारांबद्दल 'मित्रेभ्यः परित्रायस्व !' अशी ईश्वराची करुणा भाकण्याचाच बाका प्रसंग अनिलांवर येऊन पडला आहे. (५–६) श्री. शरच्चंद्र मुक्तिबोध आणि विंदा करंदीकर यांच्या कवितेवर मार्क्स-वादाची छाया इतक्या गडद रीतीने पडलेली दिसते की जोंपर्यंत मार्क्सवादी म्हणजे 'नव' असें समीकरण पक्कें होत नाही तोंवर त्यांना 'नव' म्हणण्याचा अकालीं आग्रह धरणें योग्य नव्हे. खुद्द मार्क्सवादाच्या बाबतींतहि या दोहोंत तरतमभाव आढळतो. तो आधी निश्चित करून नंतरच त्यांची प्रतवारी लावणें न्यायाचें ठरेल. ( ७–८–९ ) श्री. वसंत बापट, बोरकर व मंगेश पाडगावकर या तीन चांगल्यापैकी कवींनाहि नवकवींच्या मालिकेंत ओढण्याचे शिस्तशीर प्रयत्न सुरू आहेत. श्री. बापटांची तरल कल्पना, श्री. बोरकरांची सुरेख रेखा आणि श्री. पाडगावकरांची शब्दस्पर्शरूपरसगंधमयी प्रतिमासृष्टि यांनी आपापल्या वैशिष्ट्यपूर्ण रचनेने रसिकांना भारून टाकलें असून विचारवंत वाचकांना मराठी काव्याच्या भवितव्या-विषयी एवढा दिलासा दिला आहे की त्यांच्या वेगवेगळ्या वैशिष्ट्यांनी नटलेल्या प्रभावशाली कवितेला 'नवकाव्या'च्या एकाच दावणींत बांधून 'श्वानं युवानं मघवानम्' असा पाणिनीय अप्रयोजकपणा निदान समंजस टीकाकाराने तरी करूं नये. ज्यांची योग्यता स्वयंसिद्ध आहे अशांना त्यांच्या एखाद्याच विशेषणावरून, नसत्या उपाधी चिकटलेली भलतीच संज्ञा कां जोडावी ?

अशा प्रकारें या ना त्या कारणाने, मर्ढेकरांपासून तों पाडगावकरांपर्यंतच्या प्रमुख नऊ कवींची यांपैकी 'नव' कवींमध्ये परिगणना केली जाते. प्रत्येकाचें व्यक्तिमत्त्व परस्पर-स्वतंत्र व प्रत्येकाच्या प्रतिभेचे पैलू हे सर्वस्वीं विभिन्न असल्यामुळे त्यांना साकल्याने 'नवकवि' हीच संज्ञा द्यावयाची झाली तर ती एकाच कारणासाठी देतां येईल 'नवकवीं'त समाविष्ट करण्यांत आलेल्या या एकूण विद्यमान प्रमुख कवींची संख्या 'नऊ' आहे, हेंच तें कारण ! संस्कृतांतील 'नव' या शब्दाचा अर्थ 'नऊ' ही संख्या आहे, यावर कांही वाद होण्याचें कारण नाही व या निश्चित अर्थाने मराठींतील हें किंवा वैकल्पिक पाठभेदाने दुसरे कोणतेहि नऊ कवि हे निर्विवादपणें 'नवकवि' ठरतात ! पुढेमागे यांतील कांहींच्या बदल्या कराव्या वा कांही होतकरू उमेदवार राखीव ( Extra ) म्हणून ठेवण्यासहि कोणाची हरकत नसावी !!

'नवकवि' अथवा 'नवकाव्य' या संज्ञेंतील हास्यास्पद विसंगति इतक्या उपहासाने वर्णन करावी लागते, याचें कारण हें की, या नांवापाठीमागे सुसंगत अशी उपपत्ति शोधूनहि मिळूं शकत नाही. नवकाव्याची भाषा व प्रतिमावैचित्र्य यांवरच टीकाकारांचा विशेष काय तो भर ! पण तें वैशिष्ट्य आजकाल केवळ काव्यांतच दिसतें असें नव्हे. नाटक, कादंबरी, कथा व टीका यांतहि तें आहेच. या दृष्टीने इतर वाङ्मयप्रकारांच्या बाबतींत 'नव' हा शब्दप्रयोग काव्याइतक्या ठोकळेबाजपणाने केल्यास प्रत्येकालाच नव म्हणण्याची आपत्ति याव-

अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

याची ! मराठीसारख्या विकासशील भाषेंतील वाङ्मयांत प्रकारागणिक व व्यक्तिगणिक नवनवोन्मेष दृष्टीस पडूं लागावे हें अगदी स्वाभाविक आहे. स्थूलाकडून सूक्ष्माकडे, इतिहासांतून वर्तमान–भविष्याकडे आणि मूर्ताकडून अमूर्ताकडे नेणारा विकासमार्ग इतका स्पष्ट आहे की, उपादान लक्षणा ( Transferred Epithet किंवा transferencc of images ) हा भाषेचा केवळ अलंकार राहिला नसून तें आता विदग्ध वाङ्मयाचें माध्यमच बनलें आहे. बरें आधुनिक काव्याच्या प्रांतांत आपण पाश्चात्यांकडून व विशेषत: इंग्रजींतून बरेंचसें चांगलें उसनें घेतलें तसेंच तेथून वाईटहि उचलावें की काय हाहि विचार करण्यासारखा प्रश्न आहे. ‘ अशी असावी कविता फिरून ’ असें कवीला एकवार विचारूं नका.. पण टीकाकार, समीक्षक, संपादक हा तर रसिकांचा पाठीराखा व वाटाड्या असावा ना ? की त्याने टीकाहि ‘ सांग पाटला, काय लिहूं ? ’ अशा परपुष्टतेनेच करावी ? काव्यापासून अकाव्य वेगळें काढण्यासाठी भारतीय साहित्यशास्त्राजवळ इतकी सुंदर छाननी आहे की, तिच्या साहाय्यानेहि रसिकांस उचित मार्गदर्शन करणें कठीण होऊं नये. नवकाव्याच्या मूळपीठांत म्हणजे इंग्लंडमध्ये रोमांटिक रिव्हायव्हल् होऊन Modernism आता जुना झाला आहे व कवितेची गाडी पुनः रुळावर आली आहे. तिकडे टी. एस्. ईलियटहि पार बदलला व आम्ही आजहि त्यांनी फेकून दिलेला चोथाच चघळत बसावा की काय ? सुदैवाने उदात्तसुंदर वाक्सृष्टीचें देणें लाभलेले कितीतरी रसभावसिद्ध कवि मराठीला लाभले आहेत. त्यांच्या प्रतिभानिर्मित, संस्कारकारी काव्यरचनेचा रसास्वाद वा भावगंध लुटून रसिकांनी धन्य व्हावें की नामरूपाच्या वावटळींत गुरफटून अकाव्यालाच ‘ नवकाव्य ’ असें नकली नांव देऊन कवटाळण्याचा करंटेपणा करावा! सुदैवाने इंग्लंडप्रमाणे महाराष्ट्रांतहि अभद्रलेखनाचा पायंडा कमी कमी होत आहे. कांही वर्षांपूर्वी Modernism च्या लोकप्रियतेच्या काळांत ऑस्ट्रेलियांतील एका खवचट माणसाने सरकारी गटार खात्याचा ( Sewage Report ) एक अधिकृत अहवाल घेऊन त्यांतील कांही गद्य उतारे नवकाव्याचा सुरर नमुना म्हणून एका प्रसिद्ध संपादकाकडे पाठविला व तो त्याने त्यांतील ‘ नवते ’च्या मोहाला बळी पडून छापला ! [ पाहा Poetry Review 1954] अशा फज्जा उडण्यापूर्वीच कविटीकाकारांनी हे ‘ नव ’ मोह टाळावे व ‘ नवकवि ’ ‘नवकाव्य’ इत्यादि शब्द( च्छल ) हा एक वायफळ मिथ्याचार ( Myth ) आहे म्हणून त्यांच्या वाटेस जाऊं नये.

प्रस्तुत लेखकाने काव्याचा एक शब्दहि लिहिला नसल्यामुळे त्याला या विषयावर लिहिण्याचा स्वतःसिद्ध असा अधिकार नाही. परंतु श्रेष्ठकाव्याच्या आस्वादाला पूर्वग्रहविरहित अशा सुबुद्ध वाचकांनाहि अलिप्ततेने हातभार लावतां येतो. बालकवि–गोविंदाग्रजांच्या काव्याला ‘ नवें कवन ’ असें यथार्थपणें संबोधणाऱ्या कविश्रेष्ठ ‘-त्रीं ’ नी महाराष्ट्र कविपरंपरा अखंड आहे म्हणून उद्घोष केला. आज रसिकांचीहि कांही उणीव भासणार नाही असें रसिकांनीच आपल्या कृतीने सिद्ध करून दाखविलें पाहिजे.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## २ नवकाव्याचा दृष्टिकोन

वा. रा. कांत.

'नवकाव्याचा दृष्टिकोन' या विषयाची चर्चा येथे मला स्थूलमानानेच करावयाची आहे. आरंभीं एक गोष्ट सांगितली पाहिजे, ती म्हणजे या दृष्टिकोनाच्या अपुरेपणाचें किंवा एकांगी-पणाचें विवरण न करतां त्याचें आजचें स्थूल स्वरूपच विशद करण्याचा मी प्रयत्न करणार आहें. नवकाव्यांतील आशय आणि अभिव्यक्ति यांच्यांतून प्रतीत होणारा नवकाव्याचा दृष्टिकोन कसा साकार होत गेला, ह्याची थोडक्यांत चर्चा करणार आहें. ह्या मर्यादा लक्ष्यांत घेऊनच त्याचा विचार करावा.

'नवकाव्याचा दृष्टिकोन' हे शब्द उच्चारतांच पहिला प्रश्न उभा राहातो, तो असा की, 'काव्याच्या दृष्टिकोनापेक्षा नवकाव्याचा दृष्टिकोन कांही वेगळा–भिन्न आहे काय?' या प्रश्नाचा आपण विचार करूं लागलों की आणखी कांहीं प्रश्न उपस्थित होतात. काव्यांत नवें, जुनें असा भेद खरोखरच आहे काय? नवकाव्याचें व्यवच्छेदक लक्षण कोणतें?–काल की गुण? हें नवकाव्य केव्हापासून सुरू झालें असें मानायचें? इत्यादि.

आता या प्रश्नांचा उलट्या क्रमाने विचार करूं. कोणत्याहि साहित्यांतील किंवा काव्यांतील नवतेचा कालदृष्ट्या विचार करतांना, असें म्हणावें लागतें की, प्रत्येक नवा काल हा आपली नवी कविता निर्माण करतो. "The experience of each age requires a new expression and the world seems always waiting for its poet." इमर्सनचे हे उद्‌गार प्रत्येक काळाला व त्या काळांतील कवीला नी काव्याला सारखेच लागूं पडतील.

प्रत्येक काळांतील अनुभूतीप्रमाणे, त्या त्या काळांत कलेच्या किंवा काव्याच्या नव्या आविष्काराची आवश्यकता निर्माण होते. मानवी समाज आणि काळ यांच्या परिघांतच कला जन्म घेते, हें जरी खरें असलें तरी तो काल आणि समाज यांच्या पलीकडे वसणारें कांही सार्व-कालीन व सार्वजनीन असें कलेंत असतें. या 'कांहीतरी' मुळेच कोणत्याहि कृतीला कलारूप प्राप्त होतें, हें विसरतां येणार नाही. म्हणून कलेंत नवें–जुनें असा भेद करणें अप्रस्तुत वाटतें. कालनिष्ठ व परिस्थितिनिष्ठ असें नवें जें आज आहे, तें उद्या जुनें होईल; आजचे संकेत उद्या शिळे, निर्जीव ठरतील; आजची प्रतिमासृष्टिहि उद्या रंगहीन बनेल; आजचे कोरे करकरीत वाटणारे नवे शब्द उद्या झिजून गुळगुळीत झालेलीं बद्दू नाणीं होतील. म्हणून या किंवा अशा सामग्रीच्या नवेपणाच्या आधारावर काव्याचें नवेंपण ठरविणें योग्य होणार नाही. कलेची, काव्याची सामग्री बदलते, पण ती महत्त्वाची नाही. त्यामागील अनुभूति महत्त्वाची आहे. आनंद, दुःख, कारुण्य, जिजीविषा ह्या सार्वकालीन भावना आहेत. चिरनूतन आहेत. ह्या भावनांची उत्कटता व पृथगात्मता ज्यांत प्रकट होते तें काव्य कधीच जुनें होत नाही. तसेंच यांची उपेक्षा करून निर्माण होणारी नवकविताहि नवीन राहात नाही. स्वामिनिष्ठा व धर्मनिष्ठा ह्या भावना आज मध्ययुगीन व जून झालेल्या वाटत असल्या तरी, त्यांतून निर्माण झालेली त्यागाची व बलिदानाचीं करुणार्द्र गीतें, आजहि नवीन व ताजीं वाटतात, तीं तत्कालीन स्थलकालांनी मर्यादित झालेल्या भावानुभूतींतून निर्माण झालेल्या कालातीत अशा भावानुभूती-मुळेच. म्हणजे व्यक्तिवस्तुसंबंधाचा भावसांद्र आविष्कार करणें हाच कलेचा एकमेव दृष्टिकोन

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

असूं शकतो. कवींचे दृष्टिकोन व्यक्तिपरत्वें वेगवेगळे असूं शकतात, पण ते शेवटीं काव्याच्या उपरोक्त अेकाच प्रयोजनांत विलीन होतात. तो हेतु, तो दृष्टिकोन प्राऊस्टच्या शब्दांत असा सांगतां येईल—"It is the mission of the poet to set free the essence of our sensations by uniting them in a metaphor, so as to subtract them from the contingencies of time" या वाक्यांतील "to set free the essence of our sensations" हा शब्दबंध महत्त्वाचा आहे. इंद्रियगम्य अनुभूतींतील प्राणतत्त्वाला, स्थल-कालाच्या सीमांतून मुक्त करून त्याला एखाद्या भावप्रतिमेंत साकार करणें, हाच कलेचा हेतु, दृष्टिकोन आहे. भावानुभूतीची उत्कटता, पृथगात्मता आणि त्यांची आंतरिक संगति हाच कलेचा हेतु, दृष्टिकोन असावा.

या दृष्टीने नवकाव्याकडे बघितलें तर, त्याचा दृष्टिकोन वेगळा आहे असें वाटत नाही. गेल्या ७५।८० वर्षांपासून, किंवा असें म्हणा, केशवसुतांपासून चालत आलेल्या काव्यपरंपरेंतून व्यक्त होत आलेली जीवनांतील संघर्षाची, आनंदाची, व विफलतेची भावनाच या नवकाव्यांतून प्रगट होते.

"शून्य मनाच्या घुमटांत
कसलें तरि घुमतें गीत"

असें बालकवींनी आपल्या निराश विव्हल मनाचें वर्णन केलें आहे.

"अंध नयनिं ही बघते आशा विश्वाचे रम्याकार
जगीं कधी तें दिसणार?"

अशी भग्न हताश मनोवस्था गोविंदाग्रजांनी चित्रित केली आहे. हीच विफल भावानुभूति

"नळींतलें जग नळींत जगतें
उगीच रुसवा रसायनाचा
उगाच दावा मानवतेचा
उगाच डंका सामर्थ्याचा"

या ओळींत मर्ढेकरांनी सशब्द केली आहे.

"पद्यपंक्तिची तरफ आमुच्या करीं
विधीने दिली असे
टेकुनि ती जनताशीर्षावर जग
उलथुनिया देउं कसें"

या काव्यपंक्तींमधून व्यक्त होणारा नवनिर्माणाचा आशावाद आजच्या नवकवींत प्रकट होतो, असेंच मुक्तिबोधांची 'सूर्य-युग' आणि विंदा करंदीकरांची "ती जनता अमर आहे" या कविता वाचून प्रत्ययास येते. जीवनाचा आनंद आणि जीवनांतील वेदना यांचेच धागे आजची नवकविता विणीत आहे. परंतु तिने कांही नवीन जाणिवांचें विश्व उघडलें आहे; आशयाचें क्षेत्र बदललें आहे; भावनिक आघाताच्या नवीन जागा शोधल्या आहेत. हें तिचें निश्चित पुढचें पाऊल आहे. पण यावरून नवकाव्याने सारें विश्व बदलून टाकलें आहे असें होत नाही.

जीवनांतील निराशा, विफलता, असहायता, उद्वग, बीभत्सता, विसंगति यांबद्दलची या कवींची जाणीव अधिक तीव्र झाली आहे. यंत्रयुगांत, सामान्य माणसाची जी दैना झाली आहे, त्याने आजचें व्यक्तिमन पिचूनपिंजून निघालें आहे. एकीकडे प्रचंड शास्त्रीय शोध, सुखाची उत्तुंग रास, तर दुसरीकडे महान युद्धें, अपार संहार; एकीकडे मूठभर श्रीमंत सत्ताधारी वर्ग तर



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येणें वाग्यज्ञें तोषावें
महाराष्ट्र साहित्य परिषद

दुसरीकडे गांजलेले, पीडलेले क्षुद्र दरिद्री व किड्यासारखे वळवळणारे असंख्य श्रमजीवि. या सामाजिक आंतर विरोधाने, विषमतेने आजचें व्यक्तिमन ताणलें गेलें आहे, तुटलें आहे; आणि या तडकलेल्या मनाची व्यथाच नवकवितेचा आशय झाली आहे. परंतु हें एका विशिष्ट परिस्थितींतलें विशिष्ट मनाचें एक दर्शन आहे याचा विसर पडल्यामुळे अनुभूतीला जी 'सकल-ता' यायला हवी ती नवकवितेंत अजून उमटत नाही. अनुभूतींतला हा एकारलेपणा सोडला तर, आज प्रामुख्याने नवकाव्यांत दोनतीन प्रवाह दिसतात.

प्रथमतः ठळकपणें डोळ्यांत भरतो तो नवकाव्यांतला निराशावाद, तुच्छतावाद. मानवी जीवनांतील भयानकतेने, विसंगतीने व उध्वस्ततेने भयाकुल झालेलें पण एक प्रकारच्या तिरस्काराने, तुच्छतेने जीवनाकडे पाहणारें मन या कवितेंत कंदतांना दिसतें. सारें मानवी जीवन क्षुद्र होत आहे, एक प्रकारच्या असहायतेने पोखरून निघालें आहे. जगण्याची ईर्ष्या न उरल्यामुळे, मरणाचेंहि स्वातंत्र्य न राहिल्यामुळे, केवळ सक्तीने जगणाऱ्या समाजाला मुमूर्षुतेने ग्रासलें आहे. या रुग्ण अगतिक मानवाची संज्ञा आजच्या नवकाव्यांतील नवी जाणीव आहे. या निराशापूर्ण व तुच्छतागर्भ अशा कवितेचें स्वरूप मर्ढेकरांच्या काव्यांत अत्यंत उत्कटपणें प्रकट झालें आहे. 'पिप्यांत मेलेल्या' उंदरांच्या प्रतीकाने जीवनांतील ही मुमूर्षुता तीव्रतेने व्यक्त झाली आहे. मुमूर्षुतेच्या या कल्पनेवर, इलीयटच्या "Death in Rat's alley" या प्रतीकाची छाया पडली असावी, असेंहि कोणास वाटेल. चराचराच्या संज्ञेत दळून पीठ होणाऱ्या आणि तरीहि उद्याची जगण्याची प्रतिज्ञा करणाऱ्या मानवाचीं नवीं पाउलें उमटलेलीं आहेत, पण तींहि गेलेलीं आहेत, असें या कवीला भासतें. जागत्या जगांत प्रत्यक्ष माणसें जगत नसून, रोबींचा (यांत्रिक माणसांचा)च खडा पहारा पडलेला आहे व आजची जीवनाची समस्या ही 'सतर्षीं'चा चुकलेला प्रश्न बनून लोंबत आहे, असें या निराशावादी प्रवाहाचें स्वरूप आहे.

या निराशावादाला समांतर वाहणारी दुसरी जाणीव म्हणजे निराशेवर आरूढ होऊन मानवतेच्या उज्ज्वल भवितव्यासाठी संघर्ष करण्यासाठी धडपडणारी आशावादी प्रवृत्ति. मुक्तिबोध, करंदीकर या कवींच्या काव्यांत ही प्रवृत्ति उफाळतांना आढळते. मानवाच्या भविष्यावरील विश्वास, समाजवादी जीवनपद्धतीवरील व क्रांतीवरील श्रद्धा व समाजनिष्ठता यांचा या कवितेंतून आढळ होत असला तरी, त्याच्या तळाशीं, विकृतेने व विषमतेने दुभंगलेल्या मध्यम वर्गाचीच संज्ञा ठणकत असल्याचें जाणवतें. आजच्या विषमतेकडे, ऱ्हासग्रस्त समाजाकडे पाहून शरच्चंद्र मुक्तिबोध उद्गारतात, " कशानेशी मला येईनाशी झाली झोप " तर विंदा करंदीकर म्हणतात, " असें कांही पाहिलें ज्याने दुभंगलों. " या निद्राहीन डोळ्यांना ' गुलाबी धूळ ' उडतांना दिसते व ' विजययात्रेचा ' आरंभ झाल्याचें त्यांच्या मनाला जाणवतें. ' जनता अमर आहे ' असा विश्वासहि अंतःकरणांत उदय पावतो. ' माझ्या पीडेला अर्थ येईल ' असें कुणी म्हणतो, तर कुणी ' वेदनेला अर्थ दे रे ' अशी कळवळून याचना करतो.

ही ' पीडा, ' ही वेदना, नवकाव्याची खरी भावानुभूति आहे. कुचंबणेने, पिळवणुकीने दुभंगलेला मानव जसा या काव्यांत आढळतो, तसें आणखी एका विसंगतीमुळे द्विधा झालेलें मानवी हृदयहि यांत प्रतिबिंबित होतें. मानवाची भौतिक प्रगति आणि त्याची आत्मिक स्थितिनिष्ठता, ज्ञानाचा व बुद्धीचा विकास व भावनांची क्षुद्रता, विकसलेलें बाह्य जग आणि संकुचित झालेलें आंतर जीवन यांच्यांतील विरोधामुळे, विसंगतीमुळे, मानवी मनांत एक मोठें खिंडार पडलें आहे. विज्ञानांतील शोधांमुळे बाह्य जग प्रगत व शक्तिशाली बनलें आहे पण



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

त्या मानाने त्याचें आंतरिक जग बदललेलें नाही. त्याची बुद्धि वाढली पण भावना विशाल झाली नाही. निसर्ग-शक्तींच्या साहाय्याने जग संपन्न व समृद्ध झालें पण मानवी आत्मा विकसित झाला नाही, त्याच्या सौंदर्यशोधक बुद्धीचा विकास झाला नाही, की संस्कारक्षमतेंत फरक पडला नाही, म्हणजे असें की वैज्ञानिक प्रगतीबरोबर मानव धावूं शकला नाही. त्याच्या बुद्धीबरोबर त्याची भावना उदार व उन्नत झाली नाही. विज्ञानवादी प्रगत जग, आणि आत्मा, बुद्धि आणि भावना यांच्या गतींत अंतर पडतें,त्यामुळे प्रगतीच्या बीजांत र्‍हासाचा,सुधारणेच्या कोषांत रानटीपणाचा अंकुर उगवला. विज्ञानाने संपन्न व समर्थ झालेल्या मानवाने मानवांचीच पिळवणूक आरंभली आणि अणुबाँबचा शोध करणाऱ्या बुद्धिमान शास्त्रज्ञ मानवाने आपल्या भावांचाच संहार सुरू केला. विज्ञानाने धर्मावरची श्रद्धा नष्ट केली, पण नवीन श्रद्धास्थान निर्माण केलें नाही. विज्ञानाच्या ओळखीपूर्वी मानव हा परमात्म्याचा अंश आहे ही निष्ठा दृढ होती. परंतु मनुष्य म्हणजे अस्थिमांसाचा केवळ पार्थिव सांगाडा आहे असें आता पटविलें जात आहे.अन्नाला पूर्वी देवता–अन्नपूर्णा–मानण्यांत येत होतें पण आता ही अन्न–शक्ति Calories शरीर-पोषणास आवश्यक असणाऱ्या इंधनाच्या उष्णतामानाच्या रूपांत मोजली जाऊं लागली आहे. अशा प्रकारें, भावनेचें आसन डळमळीत बनलें, व श्रद्धेचें निर्मूलन झालें. मनाच्या या अगतिकतेमुळे, एकीकडे तुच्छता, उद्वेग व क्षुद्रता यांनी मानवाचें हृदय तुटत राहिलें, तर दुसरीकडे मानवतेच्या विकासासाठी व कल्याणासाठी तळमळणारें आशावादी मन आपल्या असमर्थतेच्या जाणिवेने विद्ध बनलें. विजिगीषेवर व समतेवर विश्वास ठेवणारें हें मन राजकीय मतप्रणालीला शरण जाऊन घट्ट ( rigid ) बनलें, तर दुसरें अश्रद्ध मन आपल्याच उध्वस्ततेंत विरून गेलें. बाह्य व आंतरिक जीवनांत, जो विस्कळितपणा आला, जी विसंगति निर्माण झाली, त्यामुळे मानवाचें व्यक्तित्व दुभंगलें. या दुभंगलेल्या व्यक्तित्वाचें व त्याच्या दुःखाचें दर्शन या नवकाव्यांत घडतें. स्टीफन स्पेंडरने या व्यक्तित्वाचें फार समर्पक वर्णन केलें आहे. "We are the divided generation of Hamlets who found the world out of joint." विस्कळित व उध्वस्त जगाचा व मनाचा लाभ झाल्यामुळे द्विधा झालेल्या हॅम्लेटच्या वंशजांचें मन नवकाव्यांतून मोठ्या सूक्ष्मतेने व विदारकपणें चित्रित केलेलें आढळतें.

या अश्रद्ध, द्विधा झालेल्या मानवाला आता हें जग धर्मशाळा न वाटतां रुग्णालय वाटतें; आणि सारीं माणसें मरण्यासाठीच या रुग्णालयांत प्रवेश करतात असें त्याला जाणवतें. समाजांतील दुष्टता त्याला सामाजिक रोग वाटते. परंतु धर्मशाळेचें रुग्णालयांत व दुष्टतेचें रोगांत मूल्यांतर केलें तरी जीवनाचा प्रश्न सुटत नाही. क्षणभंगुर जगाला धर्मशाळा मानणाऱ्या तत्त्वज्ञानाला मानवाला अढळ शांतिस्थानाचा लाभ करून देतां आला नाही तसेंच अन्याय व दुष्टतेला रोग समजणाऱ्या या आधुनिक सामाजिक स्वास्थ्यतज्ज्ञांनाहि मानवी मनाचें आरोग्य व समधातता साधतां आली नाही. कारण मानसिक व सामाजिक आरोग्याचें प्रेम व त्या आरोग्याचें आवश्यक ज्ञान त्यांना मिळवितां आलें नाही. म्हणून मानवी व्यक्तिमत्त्व दुभंगलेलेंच राहिलें व मानवजातीच्या उत्रगेने ही खिंड भरण्याचा प्रयत्न उपहासात्मक नवकाव्याने केला.

दुभंगलेल्या मनाच्या जाणिवेबरोबरच आणखी एक वेगळी जाणीव या नवकाव्यांत प्रखरपणें व्यक्त होतांना कुठेंकुठे दिसते. ही निराळी जाणीव म्हणजे अकारण बळी गेलेल्या, अज्ञान, निष्पाप, दीन माणसाच्या मृत्यूची अबोध जाणीव. या जाणिवेमुळे उत्पन्न होणारी चीड व दुःख या नवकाव्याचा एक प्रबळ स्रोत आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

याप्रमाणे हीन, क्षुद्र, अगतिक, विकृत जीवनाचें दर्शन, मानवजातीच्या भवितव्याबद्दल निराशा व उद्वेग, दुभंगलेल्या व्यक्तित्वाची पीडा, राजकीय विचारप्रणालीला शरण गेलेलें आशावादी मन, अकारण बळी जाणाऱ्या मानवाबद्दल सहानुभूति व चीड, हें सारें मिळून एखादा दृष्टिकोन जन्मास येणें शक्य असेल तर तोच आजच्या नवकाव्याचा दृष्टिकोन म्हणतां येईल. या दृष्टिकोनाचा परिणाम तिच्या अभिव्यक्तींवरहि झाला आहे. विचारप्रधानता, मुक्तच्छंदात्मकता आणि विस्कळित व उध्वस्त जीवनांतून निर्माण केलेली संज्ञाप्रवाही प्रतिमासृष्टि, हीं या अभिव्यक्तीचीं मुख्य वैशिष्ट्यें आहेत. ह्या वैशिष्ट्यांमुळे, निराशा व उध्वस्तता यांचें चित्रण नवकाव्यांत आवश्यकतेपेक्षा अधिक झालें आहे, असेंहि कुणा रसिकाला वाटलें तरीहि In the house of tragedy beauty too walked. असें यीट्स प्रमाणे म्हणण्याचा क्षण येईल अशी आशा करण्याइतका अवकाशहि नवकाव्याच्या दृष्टिकोनांत आहे, असें म्हटल्याशिवाय राहवत नाही.

---

## ३ नवकाव्यांतील भाषा : शान्ता ज. शेळके

नवकाव्यांतील भाषेचा विचार करण्यापूर्वी प्रथम काव्य आणि भाषा यांचा परस्परांशीं संबंध कोणत्या प्रकारचा असतो हें पहावयास हवें. मला असें वाटतें की भाषा हें कवितेचें एक अविभाज्य अंग आहे. शरीर व त्वचा हीं जशीं एकमेकांपासून अलग करतां येत नाहीत तशींच कविता व तिची भाषा हीं देखील एकमेकांपासून वेगळीं करतां येत नाहीत. कविता आणि भाषा दोन्ही एकमेकांशीं अगदीं एकजीव झालेलीं असतात. त्यामुळे कोणतीहि उत्तम कविता ही आपली स्वतःची भाषा घेऊन अवतरत असते. जशी कविता असेल तशी तिची भाषा असते. नवकवींपूर्वीच्या कवींपैकीं केशवसुत, बालकवि, तांबे आणि माधव ज्यूलियन हे चार कवि जर आपण पाहिले तर प्रत्येक कवीच्या कवितेच्या स्वरूपाप्रमाणेच त्याच्या भाषेचें स्वरूपहि भिन्न भिन्न झालेलें आहे असें आपणांस दिसून येईल. केशवसुतांची बंडखोर मनोवृत्ति, त्यांचा प्रखर आशावाद, सामाजिक विषमतेबद्दल त्यांना असणारी चीड आणि या सर्व आवेशयुक्त व्यक्तिमत्त्वामागे दडलेलें त्यांचें कोमल सौंदर्यप्रेमी हळवें कविमन हीं त्यांचीं सर्व वैशिष्ट्यें त्यांच्या कवितेप्रमाणे त्यांच्या कवितेच्या भाषेंतूनहि व्यक्त झालीं आहेत. म्हणून त्यांची भाषा कधी खडबडीत, कधी ओजस्वी तर कधी अत्यंत मृदुमधुर अशी आहे. बालकवींचें फुलासारखें नाजुक हळवें कविमन तशाच नाजुक व हळव्या भाषेच्या आश्रयाने व्यक्त झालें आहे. माधव ज्यूलियन, तांबे यांच्या संबंधानेहि थोड्याबहुत फरकाने हेंच म्हणतां येईल. तात्पर्य हें की कवीच्या कवितेचा आशय व त्याची भाषा हीं परस्परांपासून वेगळीं काढतां येत नाहीत. भाषा म्हणून कांही वेगळी किंवा स्वतंत्र चीज नसतेच. म्हणूनच केवळ नाजुक, गुलगुलित, कोमल शब्द लिहिणारे जे कवि असतात ते—जर त्यांच्या कवितेंत कांही प्रखर आशय नसेल तर—फार काळ टिकून राहात नाहीत; आणि म्हणूनच गोड भाषा, चांगली भाषा या शब्दांनाहि कांही अर्थ नाही.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कविता आणि तिची भाषा या दोन्ही गोष्टी अशा परस्परांशीं अत्यंत एकरूप झालेल्या असल्यामुळे जेव्हा कवितेचा आशय बदलतो तेव्हा तिची भाषाहि बदलणें अपरिहार्य असतें. नवकाव्य हें जुन्या काव्याहून बऱ्याच अंशीं वेगळें आहे. त्याचा आशय खूपच बदललेला आहे. त्यामुळे नवकाव्याची भाषाहि बदलणें स्वाभाविक होतें व त्याप्रमाणे ती बदललेली आहे यांत शंका नाही. भाषेतला हा बदल कोणत्या प्रकारचा आहे हें जर आपणांस पहावयाचें असेल तर त्यापूर्वी नवकाव्य हें जुन्या काव्याहून कसें व कोणत्या बाबतींत वेगळें आहे हें आपण पाहिलें पाहिजे.

तथापि, नवकाव्याचें वेगळेंपण सांगण्यापूर्वी ' नवकवि ' या शब्दाने कोणते कवि मला अभिप्रेत आहेत याचा प्रथम खुलासा करायला हवा. ज्या कवितेला आपण सरसकट ' नव-कविता ' हें नांव देतों तिच्यामध्ये वस्तुतः दोन प्रवाह आहेत. स्थूलमानाने यांतला एक प्रवाह ' निराशावादी ' म्हणतां येईल. निराशावादी कवींच्या काव्यांत निराशावाद कां आला ? भांडवलशाही, यंत्रांची प्रगति व या दोहोंमुळे उत्पन्न झालेल्या अनेक समस्या, स्वातंत्र्यलाभानंतर कित्येक बाबतींत झालेला स्वप्नभंग आणि भ्रमनिरास यांमुळे जीवनांत कुरूपता, बीभत्सता, रितेपणा आणि विफलता निर्माण झाली आहे असें या निराशावादी कवींना वाटतें. त्यांच्याठायीं एक तऱ्हेचा तुच्छतावाद निर्माण झाला आहे. हें सारें जग मरून गेलें असून त्याची आता तिरडीच बांधायची राहिली आहे ( पृथ्वीची तिरडी [ एरव्ही परडी फुलांनी भरली ] जळो देवा भली ) इतका कमालीचा उबग या कवींच्या मनांत निर्माण झाला आहे. मर्ढेकर, य. द. भावे, कांहीं अंशीं ग्रामोपाध्ये हे कवि स्थूलमानाने या प्रवाहाचे निदर्शक म्हणतां येतील. मराठी नवकवींतला दुसरा जो प्रवाह आहे त्याचें स्वरूप वरील प्रवाहाच्या मानाने अधिक प्रसन्न व आशावादी आहे. जीवनांतील अवघड समस्यांची व तदनुषंगाने जीवनांत निर्माण झालेल्या कुरूपतेची, बीभत्सतेची, रितेपणाची व अमंगळतेची त्यांना चांगली जाणीव आहे पण या जाणिवेने हे कवि खचून किंवा विटून गेलेले नाहीत. या साऱ्या कुरूपतेंतूनच उद्यांचें नवें सुंदर जग निर्माण होईल, आजच्या 'पीडें'तून उद्यांचें सुखसमृद्धिपूर्ण जीवन प्रकट होईल अशी त्यांना श्रद्धा आहे. अनिल, शरच्चंद्र मुक्तिबोध, विंदा करंदीकर हे कवि या दुसऱ्या प्रवाहाचे निदर्शक म्हणतां येतील.

अशा रीतीने खुद्द नवकवींत जरी दोन प्रवाह वेगवेगळे दिसत असले तरी दृष्टिकोनाचा हा मूलभूत भेद वगळला तर त्यांच्यांत अनेक बाबतींत साम्यहि आहे. या सर्वच नव्या कवींचीं कांही ठळक वैशिष्ट्यें आहेत. आणि हीं वैशिष्ट्यें जुन्या कवींहून ते कोणत्या बाबतींत वेगळे आहेत तें दाखवितात. नवकवींचीं हीं वैशिष्ट्यें कोणतीं आहेत आणि जुन्या कवींहून असलेलें त्यांचें वेगळेंपण कोणत्या बाबतींत आहे तें पाहूं या.

माझ्या मतें नवकवींचीं वैशिष्ट्यें पुढीलप्रमाणे सांगतां येतील.

( १ ) पूर्वीच्या काव्यांतलें स्वप्नरंजन-एका कल्पनारम्य, मधुर जगांत पळून जाण्याची प्रवृत्ति-नवकवितेंत दिसून येत नाही. सामाजिक वास्तवतेची अत्यंत कठोर, स्पष्ट व तीव्र जाणीव नवकवींत आहे.

( २ ) जुन्या कवितेंत येणारे शब्दालंकार, अर्थालंकार किंवा प्रतिमा या त्या कवितेचें सौंदर्य वाढविण्यासाठी, तिला नटविण्यासाठी, सजविण्यासाठी वापरल्या जात. आजच्या नव-

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कवितेतील शब्दालंकार-अर्थालंकार किंवा प्रतिमा या वास्तवाचें प्रकटीकरण करण्यासाठी, वास्तवाचा विशिष्ट ठसा वाचकांच्या मनावर अुमटविण्यासाठी वापरल्या जातात.

( ३ ) रचनेच्या दृष्टीनेहि नव्या कवितेने पुष्कळ वेगळेपणा दाखविला आहे. तिची रचना कधी मुक्तच्छंदांत असते तर कधी कधी ती अगदी छंदमुक्त गद्यासारखीहि असते.

( ४ ) अर्धसुप्त मनाच्या वेगवेगळ्या पातळ्यांवरील विविध अनुभूतींचा अत्यंत सूक्ष्म आविष्कार नवकविता करते. जुन्या कवितेंत हें फारसें बघावयास मिळत नसे.

आजची नवकविता जुन्या कवितेहून वरील बाबतींत वेगळी आहे. कवितेचा आशय असा बदलल्यामुळे तिची भाषाहि अर्थातच बदललेली आहे. भाषेंतला हा बदल कोणत्या पद्धतीचा आहे तें आपण आता पाहूं या.

( १ ) पूर्वी भाषा ही सरळ अर्थव्यक्तीसाठी वापरली जाई. कवीला कांहीतरी सांगावयाचें असे. तें जें कांही त्याला सांगावयचें असे त्याचें स्वरूप साधें, सरळ, रोखठोक असे. त्यांत फारशी सूक्ष्मता किंवा गुंतागुंत नसावयाची. त्यामुळे जुन्या कवींच्या आशयाप्रमाणेच त्याच्या भाषेचें स्वरूपहि सरळ अेकेरी रोखठोक असे. कविता अेकदा वाचली की कवीला काय म्हणायचें आहे तें वाचक समजून जाई. उदाहरणार्थ, ही कविता पहावी—

> शिरीं धोंडा लागून जखम झाली
> आणि फांदीवरुनि ती पडे खाली
> तिचा जिवलग धावला सावराया
> तीहि धडपडुनी लागली अुठाया ! ( गिरीश )

येथे कवीला अेक स्थूल स्वरूपाची घटना सांगावयाची आहे. ती त्याने सांगितली आहे आणि वाचकाला ती तात्पडतोब कळलीहि आहे. आजचा नवकवि अशी भाषा लिहीत नाही. त्याच्या आशयाचें स्वरूप अधिक सूक्ष्म, गुंतागुंतीचें, ( Complex ) असें झालेलें असल्यामुळे तो वापरीत असलेली भाषाहि पण तशीच गुंतागुंतीची झाली आहे. पूर्वीचा कवि भाषा सरळ अर्थव्यक्तीसाठी वापरीत असे. आजचा कवि भाषा ही कांही सुचविण्यासाठी वापरतो. त्याची भाषा जेवढें कांही सांगतें त्यापेक्षा कितीतरी अधिक सूचित करते. उदाहरणार्थः—

> मनास पडलीं जर खिंडारें
> भकास, थापा गाळ भिंतीचा
> अन् धमन्यांतील धारांवरती
> बर्फ रचा मग जनरीतीचा—( मर्ढेकर )

येथे कवीने जें सांगितलें आहे त्यापेक्षा कितीतरी पटीने अधिक त्याने केवळ सूचित केलें आहे. हा एक फार मोठा फरक जुन्या व नव्या कवितेच्या भाषेंत आहे.

( २ ) पूर्वीचे कवि कांही वर्णनें हीं विशिष्ट वातावरण निर्माण करण्यासाठी करीत. नाटकांत बागेचा, राजवाड्याचा, अरण्याचा जसा पडदा असतो तसा विविध वर्णनांचा 'पडदा' कवि आपल्या कवितांतून सोडीत. आजचे नवकवि अशीं वर्णनें विशिष्ट मनोवृत्ति ( Mood ) निर्माण करण्याशठी वापरतात. पूर्वीच्या कवितांतलीं हीं वर्णनें कवितेच्या वर्ण्य विषयापासून

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अलग असत. आजच्या नवकवींच्या कवितांतलीं अशीं वर्णनें कवितेच्या आशयाशीं मिळून अेकजीव झालेलीं असतात. ( हेंहि विधान स्थूलमानानेच घ्यायला हवें. कारण तांबे आणि बालकवि यांच्या कांही सुंदर कवितांतलें वातावरण एक विशिष्ट भावावस्था ( Mood ) अत्यन्त यशस्वी रीतीने निर्माण करतें ) जुन्या कवितेंतलीं वर्णनें कशीं पार्श्वभूमीदाखल असत तें पहा. शारदेचें वर्णन करतांना एक कवि म्हणतो—

शोभे तरूंचें शिरीं छत्र तुझ्या
शिलेचें तसें भव्य सिंहासन
चाले सरिद्‌गान त्या हंसलीला
तुझी हेमकांती वना भूषण !

आजचा नवकवि जीं वर्णनें करतो तीं तो मनाची विशिष्ट वृत्ति निर्माण करण्यासाठी करतो. शरच्चंद्र मुक्तिबोधांच्या ' लाल कंदील ' या कवितेंतलें हें प्रारंभींचें अंधाऱ्या बोळींचें वर्णन या दृष्टीने वाचण्याजोगें आहे.

अंधाऱ्या बोळी
भूगत ड्रेनेज पाण्याच्या समान तिमिराच्छन्न
खळाळहीन अंधाऱ्या स्तब्धशा
सुतकी घराच्यासमान खिन्नशा
अपमानिताच्या जखमा अुराच्या समान भग्नशा
अशान्त बोळी !!
बाजूस दोन्ही जुनाट उध्वस्त अंधाऱ्या भिंती
तयांच्या मधून जिवास घेऊन वाटा पळती
प्रत्येक स्थानीं अंगास चोरून वळणें घेती—!!

( ३ ) जुन्या कवितेंतील व नवकवितेंतील आणखी एक मोठा फरक रचनेबाबतचा आहे. जुनी कविता वृत्त, जाति किंवा छंद यांनी व्यवस्थित बांधलेली असे. त्यामुळे तिच्या भाषेचें स्वरूपहि नेटकें, ठाकठीक, रेखीव, बंदिस्त असें असावयाचें. आजच्या कवितेने वृत्तांचीं, छंदांचीं बंधनें झुगारून दिलीं आहेत. आपल्याला काय सांगायचें त्याचें महत्त्व आज कवीला अधिक वाटतें. तें कसें सांगावचें याला तो त्यामानाने कमी महत्त्व देतो. त्यामुळे पुष्कळदा नवकविता ही जंवळजवळ गद्यप्राय स्वरूप घेऊन प्रकट होते. ( ती ' गद्य ' असते असा मात्र याचा अर्थ नव्हे. ) विंदा करंदीकर यांच्या 'यंत्र' 'हे आइन्स्टीन' किंवा ' ती जनता अमर आहे ' या कविता या दृष्टीने पाहण्याजोग्या आहेत. शरच्चंद्र मुक्तिबोध, ग. द. भावे यांच्याहि अनेक कविता या पद्धतीच्या आहेत. नवकविता छंदाच्या बंधनांतून मुक्त झाल्यामुळे तिची भाषा अधिक प्रवाही, आवेशयुक्त, लवचिक आणि मोकळी झाली आहे.

( ४ ) पूर्वीच्या कवितेंत भाषेविषयी कांही विशिष्ट संकेत असत. अमुक शब्द कवितेंत वापरायचे, अमुक शब्द वापरायचे नाहीत असा जणू अलिखित नियम असे. कवितेची म्हणून एक भाषा, एक शब्दसंहति ठरलेली असावयाची. आजचे नवकवि भाषेचा हा सोवळेपणा मानीत नाहीत. जे शब्द कवितेंत वापरण्याची कांही वर्षांपूर्वी कवींना हिंमत झाली नसती ते शब्द आज नवकवि वापरीत आहेत. मर्ढेकरांच्या कवितेंतले बरेचसे शब्द या म्हणण्याची साक्ष देतील.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

त्याप्रमाणेच, यंत्रयुगामुळे मानवाची झालेली दुर्दशा हाहि आजच्या नवकवितेचा एक आवडता विषय आहे. त्यामुळे यंत्रविषयकहि अनेक शब्द नवकवितेंत आढळून येतात. हाडबण्डलें, शिळी स्तनाग्रें, पंक्चरलीं, पंपितो, पिस्टन, पॉलिशलेली शिसवी नक्षी इत्यादि शब्द व शब्दसंहति या दृष्टीने पाहण्याजोग्या आहेत.

( ५ ) अर्धसुप्त किंवा अवचेतन मनाच्या विविध पातळ्यांवरील अनुभूतींचीं चित्रें काढणें हें नवकवितेचें आणखी एक महत्त्वाचें वैशिष्ट्य आहे. त्यामुळे नवकवितेंतील भाषा पुष्कळदा अत्यंत क्लिष्ट व दुर्बोध बनते. पण तें अपरिहार्य आहे. उदाहरणार्थ, मर्ढेकरांची ही कविता पहा—

वन बांबूचें पिंवळ्या गातें
आकाशांतील अधोरेखितें
चराचरांतिल दळते संज्ञा
जगण्याची ( पण उद्यां ) प्रतिज्ञा
लिंब कोरतो सांबरशिंगी
जुनीं भाकितें नपुंसकलिंगी
ज्या वाऱ्यांतुन, त्यांत उमटलीं
नवीं पावलें पण मेलेलीं

नवी कविता भाषेच्या दृष्टीने कशी बदललेली आहे हें आपण इतका वेळ पाहिलें. या बदलामुळे नव्या कवितेच्या भाषेंत कांही दोष आले आहेत. तसेच तिच्यांत कांही गुणहि निर्माण झाले आहेत. दोष आहेत ते असे—( १ ) विचित्रता ( २ ) दुर्बोधता ( ३ ) अश्लीलता.

गुण पुढीलप्रमाणे दाखवितां येतील—

( १ ) नवकवितेच्या भाषेने पारंपरिकता मोडली. जुने संकेत मोडले.

( २ ) तिचें अभिव्यक्तीचें सामर्थ्य अफाट वाढलें आहे.

( ३ ) कांही अतिशय सूक्ष्म व तरल अनुभूतींचीं अत्यंत सुंदर चित्रें तिने कोरलीं आहेत.

नवकवींच्या भाषेचें स्वरूप हें असें आहे. त्यांच्या कवितेंतील अश्लीलतेबद्दल किंवा दुर्बोधतेबद्दल त्यांना पुष्कळ दोष देण्यांत येतो. तो वाजवीहि आहे. पण त्याबरोबरच भाषेचें सामर्थ्य व तिचें सौंदर्यहि कांही अंशीं त्यांनी वाढविलें आहे हें नाकबूल करण्यांत अर्थ नाही. नवकवि मनांत आणतात तेव्हा अगदी जुन्या पद्धतीचीं मधुर वर्णनेंहि ते किती समर्पकतेने करूं शकतात याची साक्ष मर्ढेकरांच्या या चार ओळींवरून पटावयास हरकत नाही.

—अजून येतो वास फुलांना
अजून माती लाल चमकते
खुरट्या बुन्ध्यावरती चढुनी
अजून बकरी पाला खाते

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## ४ नवकाव्य आणि नवकवि : : या. मु. पाठक.

नवकाव्यावरील प्रस्तुतच्या चिंतनशील, साभिनिवेश व अभ्यासपूर्ण परिसंवादांत 'आजकाल'चे आघाडीचे कवि ( कान्त, मुक्तिबोध, शांता शेळके ) बोलले असतांना, विषयाचा समारोप करण्याचा प्रसंग एका ' परवा 'च्या ( उभय अर्थाने ) कवीवर यावा, हा एक योगायोगच म्हणायचा. पूर्वसूचना नसतांहि श्रवणभक्तींत तादात्म्य साधतां येतें, पण पूर्वसिद्धतेवांचून कीर्तनांत रंगत भरणें कठीण आहे. ताटस्थ्याचें निर्भीड विचारप्रदर्शन भावनेच्या भरांत झालें असेल, पण 'तोंडसुख' घेण्याची सवंग पूर्वग्रहदूषित उपहासात्मक वृत्ति गंभीरपणें टाळली आहे. ( तरी उच्च पातळीच्या सहृदय रसिक श्रोतृवृंदांत वेळोवेळीं हशा पिकला आणि भावनोद्रेकाचा रसानंद लुटतां आला. ' भावनानिष्ठ समतानता ' साधली (!) असेल कदाचित्. ते सहजोद्गार अक्षरांत ' ग्रथित ' किंवा ' निबद्ध ' करणें कठीण काम ! त्याचें स्मरणोज्जीवित ' अंकन ' (!) करण्याचा प्रयत्न सोपा नाही ).

आजच्या पिढींतील स्वैंडरचा भ्रांतचित्त हॅम्लेट माझ्यांतहि असणारच. पण त्याचा प्रकार सनातनी व सत्यशोधक असा उभयविध आहे. परंपरा, प्रयोग, परंपरा : स्थिति, क्रांति, स्थिति हें कलादर्शक रहाटगाडगें नित्य चालूच आहे. प्रगति एका वर्तुळांतच गोल गोल फिरत असते. प्रयोगाची-नवतेची हौस अनादि आहे. मराठीच्या इतिहासांत ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास, शाहीर, केशवसुत इत्यादिकांनी हें नवें तेज, नवें ओज निर्माण केलें. त्या त्या वेळीं कुंठितगति परंपरेने त्यांच्यावर निष्प्रभ हल्ला केला व अखेर शरणागति स्वीकारली. म्हणून मुक्तिबोध इतिहासाच्या साक्षीने ठामपणें सांगतात की ज्यांच्यावर प्रतिकूल टीका होते ते शक्तिशाली असतात. पण उठवळ नव प्रयोग व तत्त्वनिष्ठ क्रांति यांत महदंतर आहे. चैतन्यपूर्ण गतिमान गर्भांत सतेज शक्तिसंचार झाला तर त्याचें मूल्य ! नव्याच्या अट्टाहासांत प्रयोगच शिल्लक उरलें आणि गर्भपातच झाला तर सारेंच आटोपलें. 'शस्त्रक्रिया यशस्वी पण रोगी दगावला ' ही ' सर्जन 'ची साभिनिवेश भूमिका, सर्जनशीलतेंत काय कामाची ? विज्ञानक्षेत्रांत ' जडा 'वर प्रयोग करतां करतां ' जड 'च नामशेष झालें. काव्यक्षेत्रांत ' काव्या 'वर प्रयोग करतां करतां ' नवकाव्यां'तील 'नव' तेंच जाणवलें व ' काव्य ' तेवढें संपुष्टांत आलें असा आभास होऊं लागला म्हणून रसिकवर्ग आरंभीं स्तिमित होऊन गेला. तोहि अस्खलापेक्षाहि नकलाने ज्यास्तच भांबावला. दशकापूर्वीं काव्यच नव्हतें असें नकली नवकवीस वाटूं लागलें व आज काव्यच पूर्णपणें नामशेष झालें असें आस्थेवाईक रसिकांस वाटूं लागलें ! चालण्यांतला नवा प्रयोग हातावर चालून पाय वर फेकण्यापर्यंत गेला तर ती मानवी चाल न राहतां विंचवाची चाल होईल. भर बाजारचौकांत असला तऱ्हेवाईकपणा थिल्लरांचें लक्ष वेधेल, पोरेंसोरें नकलून माकडचेष्टा करतील, गंभीरप्रकृति तुच्छतागर्भ व उदासीन दृष्टिक्षेप करतील, पण त्या प्रयोगाने चालण्यांत नित्याची क्रांति होणार नाही, पायाची क्रियाच खुंटेल. पायांतील वैगुण्यामुळे एका गृहस्थाने हातावर मैल मैल चालण्याची सवय केली, त्याच्या गरजेंतून निघालेल्या तऱ्हेवाईक चालण्याचें वृत्तपत्रांतून व बोलपटांतून गंभीरपणें कौतुक झालें. पण म्हणून पाय शाबूत असणाऱ्यांनी तसें चालणें हास्यास्पदच ठरेल.

' नव काव्य ' म्हटलें की प्रथम मर्ढेकर आठवतात. त्यांच्या १९४५ तील ' पिपांत

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मेले 'ओल्या उंदिर ' या कवितेने प्रचलित काव्याचा हिरोशिमा झाला. माझ्यासारख्या तत्कालीन सुप्त कवीलाहि ( ज्वालामुखीच्या भाषेत ) त्या वेळीं त्या अण्वस्त्र टाकणाऱ्याच्या कोटींत टाकून, उठतां बसतां सहज भेटणारे फायलावर धरूं लागले. " अलीकडे किती ' उंदीर ' मेले ? " लोक विचारूं लागले. जणूं कांही आम्ही प्लेग होतों. गोडसेने ब्राह्मणवर्गावर, तशी मर्ढेकरांनी कविवर्गावर आपत्ति आणली. दुर्बोधता, अश्लीलता, तऱ्हेवाईकपणा, धेडगुजरीपणा इत्यादि वरवरच्या लक्षणांकडेच अधिक लक्ष प्रथम वेधलें गेलें आणि त्यांचें काव्य टीकास्पद ठरलें. लगोलग नव्या दमाच्या समीक्षकांनी टीकाखोरांवर निकराचा प्रतिहल्ला केला. त्यांना अत्यंत मोठा आशय सूक्ष्मतेने त्यांच्या कवितांत संदिग्धतेने आढळून येऊन एका सौजन्य-पूर्ण, करुण, आरपार पाहणाऱ्या, अलिप्त वृत्तीच्या गंभीरप्रकृति तत्त्वज्ञाचा शोध लागला. मग नव्या युगाचे ज्ञानेश्वर, केशवसुत इत्यादि जुनाट बिरुदें त्यांना बहाल करण्यांत आलीं. कुणी त्यांना ' मुक्तिवादी ' म्हटलें, कुणी 'विफलतावादी' म्हटलें. कलेच्या क्षेत्रांतील त्यांची सहज क्रीडा कोणाला प्रथम माकडचेष्टा वाटली, पण नंतर त्यांच्यांतील ' माकड ' सुद्धा महात्मा-गांधींच्या तीन माकडांसारखा तत्त्वदर्शी ठरला. 'डोळे हे फिल्मि गडे' 'गिरणोदय झाला' इत्यादि विडंबनसदृश उद्‌गारांतहि कोणास आजच्या काळाचें विदारक वास्तव दिसून आलें. मर्ढेकरांची तपस्या फार मोठी आहे. १९२७–२८ सालीं ते फर्ग्युसन कॉलेजांत बी. ए. च्या वर्गात माझे सहाध्यायी असतांनाच त्यांच्या अभ्यासपूर्ण व्यासंगाची ख्याति होती. कलाक्षेत्रांत ते कधीकाळीं पदक्षेप करतील असें भाकीत त्यावेळीं करणें अशक्यप्राय होतें. यानंतर अनेक वर्षे त्यांनी मूक व्यासंगांत घालवलीं. १९४१ सालीं ' वाङ्मयीन महात्मता ' या आपल्या समीक्षा-ग्रंथाने मर्ढेकरांचें अभिनव व्युत्पन्न रसिकत्व आकर्षक ठरलें, आणि त्यावेळच्या कांही लोकप्रिय कवितेंतील कलाहीनता उघड झाली. कलात्मक आत्मनिष्ठा, तादात्म्य व महात्मता यांच्या एकसंध चैतन्यपूर्ण समन्वयांतूनच खरीखुरी जिवंत कलाकृति निर्माण होते हें प्रमेय त्यांनी मराठी वाङ्मय ' पुरेसें परपुष्ट ' करण्याकरता इटालियन भाषेतून घेतलें! त्या आदर्श काव्याचा सगुण साक्षात्कार त्यांना बालकवींच्या 'पारवा' 'खेड्यांतील रात्र'आदि गीतांत झाला. बालकवींनाच ते जातिवंत कवि मानतात. त्यांची ' नवकाव्या'ची कल्पना अशी सनातन 'अतएव नित्य-नूतन ' आहे. प्रकृतिधर्माने वा व्युत्पन्नमूलक प्रयोगनिष्ठेने त्यांची 'कांहीं कविता' व 'आणखी कांही कविता ' ही 'इलियट'च्या तोंडावळ्याची भासूं लागली. नव्या काळाचा नव्या पद्धतीचा नवा आशय मांडतांना ' इलियट ' प्रभृतींना ज्या धडपडीचा प्रवास करावा लागला तसाच कठिणाईचा गिर्यारोहक तेनसिंग त्यांच्या मृदु प्रकृतींत जागृत झाला. त्यांनी शिखर गाठलें पण मनांत नसलेल्या भलत्याच शिखरावर ते नकळत जाऊन पोचले अज्ञेयवादाच्या निराशेइतकेंच त्यांचें थोडेंबहुत नातें बालकवींशीं राहिलें. ऐतिहासिक दृष्ट्या ( आशयाच्या व प्रकृतीच्या नव्हे ) त्यांच्यासारखें अल्पसंख्य कलाकृतींवर अलौकिक यश, कांहीसें उशीरा असें, पूर्वी Bee कवींना मिळालेंच आहे. Bee चें पहिलेंच 'वेडगाणें' आशय-पूर्ण तऱ्हेवाईकपणाने विजेप्रमाणे दिपवून गेलें. बालकवि, बी, यांचा मराठींत पंथ निर्माण झाला नाही. मर्ढेकरांचें अल्पकाळ पोरासोरांनी अनुकरण करून पाहिलें पण तें जमलें नाही. वरवरच्या लक्षणांचें अनुकरण म्हणजे बुवाबाजी ठरली. पण त्याचें गालबोट जातिवंत ब्रह्मसाक्षात्काऱ्याला लावणें ही चूक आहे. मर्ढेकरांची दुर्बोधता ही त्यांच्या व्युत्पन्नतेमुळे आलेली शरणागतीहि असूं शकेल कदाचित्. किंवा अजाणतां घडलेली खेळकर क्रीडा असेल.मद्याच्या अधू पायाच्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

माणसानें हाताच्या आधारानें जलदीने मार्गक्रमण करावें तीच गरजेंतून निघालेली युक्ती. एरव्ही त्यांना स्वतःला बालकवींचा प्रसादमय मधुर पदविन्यास आवडला नसता ! कदाचित् ही दुर्बोधता आणण्याची धिटाई त्यांना ' इलियट ' आदि इंग्रजी कवींच्या यशानेहि आली असेल. रसज्ञ मर्ढेकर आणि मराठी कवि मर्ढेकर ( त्यांच्यातील इंग्रजी कवि वेगळ्या तोंडवळ्याचा आहे) यांच्यांत फार मोठें अंतर पडलें आहे.

तें कांही का असेना मराठी कवींत मर्ढेकरांना एक निश्चित गौरवाचें स्थान मिळालें आहे; याविषयीं आज दुमत होण्याचें कारण नाही. इच्छा एवढीच आहे की उत्तरकालीन ' इलियट ' प्रमाणे वा त्यांच्या आदर्श बालकवीप्रमाणे आता त्यांच्या गंभीर आशयाला प्रसाद यावा. त्यांची स्वतःचीहि तीच इच्छा आहे. ' शब्द अर्थाआधी यावा हें तों ईश्वराचें देणें'. आपल्याकडे लक्ष वेधण्यासाठी त्यांनी जे हास्यास्पद मुखवटे आजवर धारण केले त्यांचा त्यांनी त्याग करावा. आणि आपल्या थोर व्यक्तित्वाचें चिंतनशील दर्शन सरळ सरळ द्यावें. इतर सामान्यांनी तर त्यांच्या परपुष्ट शैलीचें मुळीच अनुकरण करूं नये. ( १९५२ नंतर पुन्हा मराठी काव्यांत कांही प्रसन्न सोज्ज्वल प्रवाह सुरू झाले आहेत, तेव्हा हें सांगण्याची आज गरज उरली नाही. मर्ढेकरी शैली संपुष्टांत आली आहे. )

बालकवींच्या काव्याशीं या नवीन काव्याचें विशेष साम्य आहे. मर्ढेकरांना जें हवें होतें तें या आजकालच्या कवितांत थोडेंबहुत दिसत असेल काय ?बालकवींच्या औदुंबरांतील चेतनगुणोक्ति सर्वत्र दिसून येते. कांही कालापूर्वी पु. शि. रेगे यांच्या काव्यांत ती विशेष प्रमाणांत दिसली.रेग्यांना कांही टीकाकारांनी चुकून नव-कवींत टाकलें आणि एकदा त्यांना स्वतःलाहि तसें वाटलें.आज रेगे स्वतःला सनातनी वृत्तीचेच मानतात.त्यांच्या शृंगाराचें नातें फार फार जुन्याशीं आहे. आजच्या परिसंवादांत रेग्यांचा कुणी नव-कवि म्हणून उल्लेखहि केला नाही ! मात्र याचा अर्थ त्यांचें काव्य उच्च दर्जाचें नाही असा होत नाही.

कांहीतरी ' नव ' आणण्याचा अट्टाहास हाच आजच्या दूमवेड्यांचा महान् दोष आहे. कांही नवीन करण्याच्या अभिनिवेशांत रसिकांचें लक्ष वेधतें पण काव्य शिल्लक राहात नाही. आदर्श कलाकृतींत प्रत्येक आशयाची अभिव्यक्ति सहजतेने निर्माण झाली पाहिजे. सत्कृतींत ती तशीच होते. एखादी चाकोरी लोकप्रिय होते पण त्या चाकोरीच्या गुलामींत कलाकृती निष्प्रभ होते. साच्यांतल्या मूर्तींना मोल कमीच.

आजच्या स्पर्धायुगांत पहिला कोण याचेंच महत्त्व फार. 'नवकाव्य' म्हणून एक साचा तयार करायचा, ( केवळ अट्टाहासाने अगर आपल्या आवडीनिवडीने ) तो प्रत्येकाने वेगवेगळा कल्पायचा, आणि मग स्वतःलाच खराखुरा सत्प्रवृत्त नव-कवि म्हणून डांगोरा पिटवायचा. स्वतःच्या टिमकीची गरज वाटावी याचाच अर्थ त्यांत मूलतः वैगुण्य आहे. त्यांच्याकडे कोणाचें लक्ष जात नाही म्हणून हे आपले मोठ्याने ढोलके वडवतात. त्यांच्या प्रचारकी शब्दनिष्ठ अवडंबरांतून, मार्क्सचे डोस देत देत नवा समाज आपल्या काव्याने निर्माण करण्याची ईर्ष्या, ते गद्य प्रचाराची पुस्ती जोडत जोडत बाळगतात. हे शब्दजंजाळहि एका स्वप्नरंजनांतच चूर असतें. गतिमान क्रांतिशील समाजघटनांचे हे केवळ भाट होत. आमूलाग्र जीवनाचा दिक्कालांतील ठाव घेणारी कला, यांच्या विचारराज्यांतील तुरुंगाच्या कोठडींत बंदिस्त आहे. वर्गकलह, वर्गसंस्कृति इत्यादि स्थूल सार्वत्रिकतेच्या पाहणींत यांना वर्गकलेचीहि शिस्तींतील पलटण दिसूं लागते. पण हें गद्यांतील त्यांच्या प्रचारांतच. ' मध्ययुगीन व्यक्तिनिष्ठा, स्वप्नरंजन ' यांचा आढळ कलेच्या मुक्त-संचारांत भरारी मारतांना त्यांच्याहि काव्यांत

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

दिसून येतो. जुन्या प्रतिमा अलंकृतीकरता व नव्या प्रतिमा वास्तवाकरिता, अशी भाषा हे वापरतात, पण त्यांच्या कवितांची छाननी करतांना पुष्कळदा कल्पकताप्रधान (Romantic) प्रवाहाशींच त्यांचा संगम होतो. समाजाभिमुखतेच्या आशावादी नवकवींत 'अनिल' पहिले आहेत असें ठरलें तर कुणाचें काय जातें? पण पहिलें, दुसरें हें ठरवणेंच बालिश आहे. प्रत्येक कलाकृती आपापल्या परीने नित्य पहिलीच असते. 'नव काव्यां'त अनिलाला पहिलें ठरविलें म्हणजे त्यांच्या 'फुलवातीं' तील स्निग्ध गोडवा कमी होत नाही. शरच्चंद्र मुक्तिबोध, विंदा करंदीकर हे यशस्वी कलावंत आहेत.पण आपणच कोणी एक असा दिमाख ते दाखवीत असल्यास, त्यांच्या गुणवत्तेमुळेच तो क्षम्य ठरतो.

१९४४ च्या आपल्या "काव्य आणि क्रांति" या भाषणांत या गटाच्या गुरूंनी म्हणजे स्वतः अनिलांनीच असें स्पष्ट म्हटलें आहे की, "...ठराविक कल्पनाविज्ञानाच्या प्रचार-यंत्राला कवीला राबवून घेतां येणार नाही. तसा सक्तीचा, दबावाचा प्रयत्न झाल्यास काव्य तर स्फुरणार नाहीच पण कवीहि उरणार नाही. कला स्वतःचेच नियम मात्र जाणते; दुसरे कोणतेहि नियम जाणत नाही, मानत नाही. तिच्यावर असे नियम लादणें म्हणजे तिला गाडणेंच होय!"

मध्यम वर्गातील आजच्या कवीला समाजांत असें काय स्थान आहे की त्याने समाज बदलण्याची भाषा बोलावी? विनोबासारख्या व्यक्तीने अशी भाषा बोलावी. पोटापाण्याच्या फिकिरींत असलेल्यांनी आपल्या काव्याने समाजक्रांती होईल हें मानणें म्हणजे स्वप्नाळु तंद्रीचेंच द्योतक आहे. तसली कविता स्वप्नरंजनात्मक कलाकृति होऊं शकेल. किंवा फार तर एखाद्या क्रांतिकारकाला ती स्फूर्तिस्थान होईल. "गीं"तील भावानंदाने अनेक समाजसेवकांना स्फूर्ति दिली असेल. कवीनें समाजनिष्ठ राहण्याचा उपदेश अनावश्यक आहे. खरा कलावंत आपल्यांत सारें विश्वच पाहतो, दिक्कालातीत अशी त्याची दृष्टि असते. संपूर्ण मानव्याचें दर्शन त्याच्या प्रतिभेच्या दीप्तीने त्याला स्वतांतच होते. याच अर्थाने कला मुख्यतः आत्मनिष्ठ व्यक्तिनिष्ठ, असूनहि केवळ समाजनिष्ठच नव्हे तर अखिल जीवननिष्ठ असते.

आजच्या बहुजनसमाजांत आजच्या कवीच्या काव्यकलेचा परिचयहि नाही. एक प्रभावी व्यक्ति म्हणून सामान्यांत तो मुळींच परिचित नसतो. हॉटेलांत चहा प्यायला गेला तर हा कविवर्य वा क्रांतिकारक 'एक इसम दोन आणे' या गटांतच सामील होतो. हा समाजक्रांति कशी करणार? नभोवाणीमुळे व कविसंमेलनाने सुशिक्षित लोकांत याचा मान-मरातब थोडाबहुत असतो. पण त्याच्या आशयांतील क्रांतिकारकत्व परपुष्टतेने त्यांनाहि स्फूर्तिप्रद होत नाही. अजूनहि बहुसंख्य वाचकांच्या दृष्टीने त्याची मासिकांतील कविता 'एक उलटें पान'च आहे. अशी स्थिति असतांना कांहीं मोजक्या कवींनी 'नव' हा छाप स्वतःस मारून घेऊन, इतर बहुसंख्य कलावंतांना जुनाट; तुच्छ इत्यादि सदरांत नकळत टाकूं इच्छिणें, हें मराठी काव्याच्या अखंड जिवंत प्रवाहास तारक नसून, मारक आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# परीक्षणें

**आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास (भाग पहिला, इ. १८७४ ते १९२०):**
[ लेखक, प्रा. अ. ना. देशपांडे, एम्. ए.; पृष्ठसंख्या ६४१; व्हीनस प्रकाशन, पुणें; इ. स. १९५४; किं. रु. १२ ].

मराठी वाङ्मयाच्या इतिहासाची एक योजना विचारवंतांच्यासमोर असतांना प्रा. अ. ना. देशपांडे यांनी लिहिलेला ‘ आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास ’ प्रसिद्ध होत आहे या गोष्टीस एका दृष्टीने विशेष महत्त्व आहे. कारण हा इतिहास जाणत्यांना मानवला तर तो पुढे ठेवून त्यावरून अधिक विस्तृत व तपशीलवार अशा भव्य इतिहासाची योजना ते करूं शकतील. बरें, तो विद्वज्जनांच्या परितोषास न उतरला तर त्यापासून ते कांहीं धडाहि घेऊं शकतील. सारांश, कोणत्याहि बाजूने विचार केला तरी प्रा. देशपांडे यांचा हा प्रयत्न स्वागतार्ह ठरतो. इतर दृष्टींनी पाहतांहि मराठी वाङ्मयाचे अभ्यासक प्रा. देशपांडे यांचे ऋणींच राहतील. कारण ‘ महाराष्ट्र–सारस्वता ’ प्रमाणे अर्वाचीन वाङ्मयाचा समग्र, संपूर्ण, संगतवार व समाधानकारक असा इतिहास अजून तरी उपलब्ध झालेला नाहीं. कांहीं स्फुट व कांहीं शाळकरी स्वरूपाचें असे मिळून प्रयत्न आजवर थोडेफार झाले. परंतु भरीव आणि भारदस्त हीं दोन्ही विशेषणें ज्याला यथार्थपणें शोभून दिसतील असा हा पहिलाच प्रयत्न होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. इ. १८७४ ते १९२० या अर्धशतकांतील मराठी वाङ्मयाचें सुमारें ६०० पृष्ठांचें हें समालोचन एकट्याने योजून एकट्यानेच लिहून पूर्ण केलें ही गोष्टहि कौतुकास्पद आहे. पण एवढ्यासाठी वाचकांनी लेखकाची पाठ थोपटावी असें मात्र आम्हांस वाटत नाहीं. कारण एकहाती रचनेंत जसे कांहीं गुण तसेच कांहीं दोषहि संभवतात. शिवाय एकहाती रचना अगदींच सुमार उतरल्याचीं उदाहरणेंहि मराठींत थोडीं नाहींत. तेव्हा आपला एकाकी उद्योग यशस्वी करून दाखविणें हें प्रा. देशपांडे यांचें खरें श्रेय होय असें आम्ही मानतों. उपाधींच्या मागे धावून ‘ आपण कष्टी, लोकहि कष्टी ’ असा प्रकार त्यांनी होऊं दिला नाहीं म्हणून ते अभिनंदनास पात्र आहेत.

वाङ्मयेतिहास भिन्नभिन्न दृष्टींनी लिहितां येतो या गोष्टीची जाणीव लेखकांस आहे. आपली ‘ भूमिका ’ विशद करतांना व्यक्तिप्रधान, तंत्रप्रधान व तत्त्वप्रधान अशा तीन दृष्टि ते सांगतात व प्रस्तुत वाङ्मयेतिहासांत या “ तिन्ही दृष्टींची यथाप्रमाण बूज राखलेली आहे ” अशी ग्वाहीहि देतात. या विधानाच्या समर्थनार्थ म्हणून व्यक्तिनिष्ठ दृष्टिकोन ठेवूनहि या कालखंडांतील वाङ्मयप्रकारांत जुने तंत्रविशेष मागे पडून नवे तंत्रविशेष रूढ कसे झाले व त्याचप्रमाणे पाश्चिमात्य संस्कृतीच्या संपर्कानंतर महाराष्ट्रांत निर्माण झालेल्या भिन्नभिन्न विचारप्रणालींचे पडसाद प्रस्तुत कालखंडांतील वाङ्मयांत कसे उठल याचेंहि निवेदन आपण केलें असल्याचें लेखक सांगतात. परंतु या बाबतींत वाचकांचा अभिप्राय थोडा निराळा पडेल असें वाटतें. कारण सबंध सहाशें पानांचा हा इतिहासग्रंथ वाचून खाली ठेवल्यावर लेखकाने एका धोंड्याने दोनच नव्हे तर तीन पक्षी मारण्याचा संकल्पच कोठे ठेवलेला दिसून येत नाहीं. लेखकाची दृष्टि उघडउघड व्यक्तिनिष्ठ आहे व या ग्रंथाची ‘ पाठराखणी ’ करतांना प्रा. रा. श्री. जोग

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

यांनी तसें स्पष्टपणें म्हटलेंहि आहे. ते सरळ लिहितात, की "हा इतिहास म्हणजे अनेक लेखकांची एक 'पोर्ट्रेट–गॅलरी' असून त्या व्यक्तिचित्रांना असणारी पार्श्वभूमि मात्र ठळक नसल्यासारखी वाटते." (पृ. ८). इतिहासकाराच्या ठिकाणीं ही व्यक्तिप्रधान दृष्टि आहे म्हणून तर प्रा. जोगांप्रमाणे इतर वाचकांनाहि कोठे कोठे 'चुकल्यासारखें' वाटतें. उदाहरणार्थ, गडकऱ्यांच्या नाट्याबरोबरच गोविंदाग्रजांच्या कवित्वाचा परामर्श घेतला गेल्यामुळे काव्यविवेचनाच्या ओघांत चांगलाच खंड पडतो; व कोल्हटकरांच्या नाट्यविषयक विवेचनांतच आलेलें त्यांचें कादंबरीकर्तृत्व किंवा विनोदी लेखन यांजविषयींचें विवेचन 'अ-पदस्थ' वाटतें. वाङ्मयेतिहास व्यक्तिमूलक दृष्टिकोनांतून लिहावा की प्रवृत्तिनिष्ठ दृष्टिकोनांतून लिहावा हा प्रश्न प्रा. जोग म्हणतात त्याप्रमाणे मतभेदाचा असेल. परंतु व्यक्तिनिष्ठ दृष्टिकोन ठेवल्याने कांही गोष्टी खटकतात हें मान्य करावेंच लागेल. तथापि याप्रमाणे एकच व तीहि व्यक्तिप्रधान दृष्टि ठेवून इतिहासरचना केल्याबद्दल प्रा. देशपांडे यांना बोल लावणें अयोग्य होईल. कारण तीन भिन्नभिन्न दृष्टि ठेवून गोधडीवजा रचना करण्यापेक्षा एकच दृष्टिकोन ठेवून रचनेंत एकसूत्रता आणणें हें केव्हाहि अधिक श्रेयस्कर होय. ही एकसूत्रता प्रा. देशपांडे यांच्या ग्रंथांत आहे व ती एक दृष्टिकोन साद्यन्त सांभाळल्यामुळे आलेली आहे. लेखक म्हणतात त्याप्रमाणे तीन निरनिराळ्या दृष्टिकोनांच्या समन्वयांतून उत्पन्न झालेली नव्हे.

प्रा. देशपांडे यांची ही कृति अभ्यासकांच्या अनेक गरजा भागविण्यास समर्थ आहे असें आमचें प्रांजळ मत आहे. नियोजित कालखंडांतील वाङ्मयनिर्मात्यांच्या चरित्रांची आवश्यक तेवढी रूपरेषा त्यांनी दिली आहे. तसेंच जरूर तेथे त्यांच्या व्यक्तित्वाचेंहि रेखाटन त्यांनी केलें आहे. या निर्मात्यांच्या हातून लिहिल्या गेलेल्या ग्रंथांची विषय व स्वरूप या दृष्टींनी संगतवार व विश्वसनीय अशी माहिती त्यांनी मोठ्या साक्षेपाने दिली आहे. या वाङ्मयाचें यथार्थ आकलन व्हावें म्हणून त्यामागील वैयक्तिक व सामाजिक प्रेरणाहि त्यांनी चर्चिल्या आहेत. शेवटीं, या वाङ्मयाचें चिकित्सक दृष्टीने गुणदोषविवेचन व मूल्यमापन करण्यांतहि त्यांनी कसूर केलेली नाही. सारांश, सर्वांचें समाधान करील असा हा ग्रंथ आहे. प्रा.देशपांडे यांच्या या कृतींतील कांही गुणविशेषांचा मुद्दाम निर्देश करावासा वाटतो. प्रथम म्हणजे वाङ्मयाकडे पाहण्याची त्यांची व्यापक दृष्टि. ही नसती तर त्यांच्या इतिहासाची बैठक फार कोती होऊन इतिहासकार राजवाडे, वासुदेवशास्त्री खरे, ज्ञानकोशकार केतकर इत्यादि एका विशाल भूमिकेवरून ग्रंथरचना करणारी मंडळी त्यांच्या निवेदनांतून सुटली असती. परंतु ललितवाङ्मय हेंच काय तें खरें वाङ्मय असा संकुचित दृष्टिकोन लेखकाच्या ठिकाणीं नसल्याने सुदैवाने तसें झालें नाही. प्रा. देशपांडे यांच्या ग्रंथांतील दुसरा गुणविशेष म्हणजे परमतखंडनांत त्यांनी दाखविलेलें कौशल्य, स्पष्टता व सभ्यता. आधुनिक वाङ्मयाच्या इतिहासकारावर परमतखंडनाचे प्रसंग अनेकदा येतात. अशा प्रत्येक प्रसंगीं प्रा. देशपांडे यांची लेखणी प्रभावी ठरली आहे. नमुना म्हणून श्री. राजाध्यक्ष यांच्या केशवसुतांच्या संस्कृताध्ययनविषयक मताचें (पृ. ५६२), कै. राजवाडे यांची भाषा ओबडधोबड आहे या वि. ह. कुलकर्णी यांच्या मताचें (पृ. ५६५), मराठी निबंधविषयक डॉ. देशमुख यांच्या मताचें (पृ. ५७०), व श्री. परांजपे यांनी आपले पितामह शिवराम महादेव यांच्यासंबंधीं काढलेल्या अतिशयोक्त उद्गारांचें (पृ. २४४) लेखकाने केलेलें खंडन पहावें. परमतखंडनाबरोबरच परऋण मान्य करण्यांतहि त्याने कोठे कसूर केलेली नाही. उदाहरणार्थ, पृ. ३६५ वर केशवसुतांच्या कांही कवितांचीं इंग्रजी मूळें सांगतांना या विवेचनाचें श्रेय त्याने प्रा. जोग व प्रा.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पंडित यांना मोकळ्या मनाने दिलें आहे. तसेंच विचाराचें कोणतेंहि एक टोक न गाठतां सुवर्णमध्य साधण्याची लेखकाची हातोटीहि प्रशंसनीय आहे. गडकऱ्यांच्या प्रतिभेने जीवनानुभूतीच्या अथांग आकाशांत उड्डाण केलें होतें हें डॉ. अळतेकरांचें व गडकऱ्यांची प्रतिभा ही केवळ प्रहसनानुकूलच होती हें प्रा. वा. ल. कुलकर्णी यांचें अशा या दोन आत्यंतिक स्वरूपाच्या मतांच्या सुवर्णमध्यांत कोठेतरी या नाटककाराच्या प्रतिभेचें वास्तव स्वरूप सापडूं शकेल असें सुचविण्यांत लेखकाचें समन्वयाचें धोरणच दिसून येतें ( पृ. ३४३ ). त्याच्या अंगीं मार्मिकताहि आहे. श्री. कृ. कोल्हटकरांच्या नाटकांतून दिसून येणारी अवास्तव व असंबद्ध स्वरूपाची रहस्यमयता आणि त्यांच्या टीकालेखांत व विनोदांत आढळणारा कुत्सागर्भ उपहास यांच्या मुळाशीं त्यांचें शारीरिक व्यंग व तज्जन्य एकलकोंडेपणा हीं असल्याचें सत्य लेखकाने मोठ्या मार्मिकतेने कोणास न दुखवितां सुचविलें आहे. (पृ. २६३). प्रा. देशपांडे यांची भाषाशैलीहि मोठी घाटदार आणि डौलदार असून वर्ण्य विषयाला अनुरूप असें वळण घेण्याइतपत लवचीकपणा तिच्या अंगीं असल्याने त्यांच्या ग्रंथांतील कोणतेंहि पान उघडलें तरी वाचक त्यांत रमून जातो. इतिहासासारखा रूक्ष विषय त्यांनी आपल्या वेधक शैलीने व मार्मिक निवेदनपद्धतीने रसाळ करून सोडला आहे यांत कांहीच शंका नाही.

याचा अर्थ हा इतिहास निर्दोष उतरला आहे असा नव्हे. त्यांतील उणिवांची जाणीव कदाचित् स्वतः लेखकास इतरांच्याहून अधिक असेल. कारण त्याच्या अडचणी त्याला माहीत ! इतकें मात्र खरें की त्यांतील कांही दोष लेखकाच्या अतिरिक्त उत्साहांतून निर्माण झालेले दिसतात. म्हणजे एका दृष्टीने हा गुणातिरेक होय असें म्हणतां येईल. उदाहरणार्थ, आपलें सर्व अध्ययन प्रस्तुत इतिहासाच्या कामीं लावण्याच्या उत्साहाच्या भरांत प्रा. देशपांडे यांनी डॉ. भांडारकर यांच्या झाडून सर्व इंग्रजी ग्रंथांचा आढावा घेतलेला आढळतो ( पृ. ५६६ ). डॉ. भांडारकर मोठे असले तरी त्यांच्या या अ-मराठी लेखनाची यादी याठिकाणीं तरी कांहीशी अप्रस्तुत वाटते. हीच विषयाची अतिव्याप्ति व हाच उत्साहाचा अतिरेक इतिहासकार कै. राजवाडे यांच्यावरील प्रकरणांतहि आहे. राजवाडे यांचें भाषाप्रेम व भाषाभ्यास ध्यानीं घेतां एक वळ हेंहि चालेल. परंतु चरित्रकार रा. ब. पारसनिसांविषयीं लिहितांना त्यांच्या ब्रह्मेंद्रस्वामीविषयक ऐकांतिक मतांचा राजवाडे यांनी आपल्या तिसऱ्या खंडाच्या प्रस्तावनेंत जो कलमवारीने समाचार घेतला आहे तो जसाच्या तसा उद्धृत करून त्यासाठी तीन पानें खर्च करणें हें प्रस्तुत इतिहासग्रंथाच्या सर्वस्वीं कक्षेबाहेरील आहे असें आम्हांस वाटतें ( पृ.४८८-४९० ). हा प्रकार पाहून आत्मारामकृत ' दासविश्रामधामा 'ची आठवण कोणासहि होईल. आत्माराम जसे "मग स्वामींनी एकवीससमासी लिहिली " असें म्हणून सबंध एकवीससमासी उतरवून काढतात, तसें कांहीसें प्रा. देशपांडे यांचें झालें आहे. ' निबंधमाले 'ची रचना चिपळूणकरांच्या अंगीं असलेल्या मुत्सद्देगिरीच्या तत्त्वाला धरून कशी आहे ही एक साधी गोष्ट सांगण्यासाठी त्यांनी श्री. बेलसरे यांच्या उपोद्घातांतील दोन पानें सरळ उतरवून काढलीं आहेत. ( पृ. ४९-५१ ). हीच गोष्ट कै. वि. कों. ओक यांच्याविषयीच्या प्रा. बनहट्टी यांच्या अभिप्रायावर टीका करतांना घडली आहे ( पृ. १११ ). कै. ओकांसारख्यांनी एकट्याने ' बालबोध ' मासिक अव्याहत चौतीस वर्षे चालवून अक्षरशः शेंकडो लहानमोठे लेख लिहिले याबद्दल प्रा. बनहट्टींनी त्यांची थोडी अवास्तव स्तुती केली तरी त्यांत खरोखर बिघडलें कोठे ? याचा अर्थ ते ओकांना चिपळूणकरांच्या पंक्तीस बसवितात असा थोडाच आहे ? पण अर्थवाद या नांवाची एक चीज साहित्याच्या बाजारांत आहे याचा विसर पडून, "कै. ओकांचें कर्तृत्व पाहून आपलें मन थक्क

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

होऊन गेलें " या प्रा. बनहट्टींच्या एका वाक्यावर घसरून शेवटीं त्यांच्या या अभिप्रायाला 'असंबद्ध प्रलाप' हें विशेषण प्रा. देशपांडे यांनी बहाल केलें आहे. हा सर्वच प्रकार आम्हांस अनुचित व अनुदार वाटतो. कारण कोणी कांहीहि म्हटलें तरी ओक व चिपळूणकर ह्यांतील अंतर जाणते ओळखतात. जें सिद्धच आहे तें सिद्ध करण्यासाठी एवढी आटापीट कशाला ? असो. कांही ठिकाणीं स्वत: लेखकानेच परस्परविरोधी मतें मांडल्याचें दिसून येतें. उदाहरणार्थ, कै. पांगारकरांच्या संत-चरित्रांतून " केवळ भोंगळ भाविकतेचें प्रदर्शन " होत नसून त्यांच्या विवेचनांत "सर्वत्रच भाविकता व रसज्ञता या गुणांबरोबर साक्षेपशील संशोधनाचें आणि चोकस चिकित्सेचेंहि दर्शन घडतें " असें पृ. ४९७ वर म्हणून, लगेच पुढे पृ. ५८८ वर लेखक म्हणतात, की " पांगारकरांच्या इतिहासांत भाविकांच्या तोंडाला पाणी सुटविणारी श्रद्धेची साखर प्रमाणापेक्षा जास्त झालेली आहे." वरील दोन विधानांत विसंगति उघड दिसते. असाच कांहीसा प्रकार प्रा. बनहट्टी यांच्या मताचें पृ. ११२ वर खंडन व पृ. ६० वर मंडन करण्यांत झाला आहे, व तो संदर्भ सोडून वाचल्यामुळे झाला आहे असें वाटतें. क्वचित् कोठे सर्व-साधारण वाचकाचे मतभेद होतील अशींहि ठिकाणें या ग्रंथांत आहेत. इ. स. १८८५ पर्यंतच्या काळांतील सर्वांत महत्त्वाचें आत्मचरित्र म्हणजे दादोबांचें असें लेखक म्हणतात. (पृ. ११३). हा मान, बहुमत जरी घेतलें तरी, बाबा पदमनजींच्या 'अरुणोदया'कडे जाईल असें वाटतें. तसेंच पृ. ५०१ वर लेखकाने केलेलें कै. पांगारकरांच्या 'चरित्रचंद्रा'चें रसग्रहण सर्वांनाच मान्य होईल असें नाही. पण ही बाब मतभेदाची आहे. प्रा. देशपांडे यांच्या या इतिहासपटाला पुष्कळ ठिकाणीं इतरांच्या मतांचीं लांबरुंद ठिगळें जोडलेलीं आढळून येतात, यांत मात्र मतभेद होईल असें वाटत नाही. एकच उदाहरण द्यावयाचें तर लो. टिळकांच्या 'गीतारहस्या'चा परिचय त्यांनी सर्वस्वीं न. चिं. केळकरांमार्फत करविला आहे हें दाखवितां येईल. (पृ. १६०-१६३). हा प्रकार सर्व ग्रंथभर आढळतो. दुसऱ्याचें एखादें वाक्य उद्धृत करणें निराळें व त्याचे उताऱ्याच्या उतारे उतरवून काढणें निराळें. लेखकाच्या अंगीं स्वतःचे अभिप्राय स्वतःच्या शब्दांत व्यक्त करण्याचें सामर्थ्य असतांना त्याने ही उसनवारी कां करावी तें समजत नाही. यामुळे या इतिहासास अधूनमधून एखाद्या गोधडीचें (Patch Work)चें स्वरूप आलें आहे. क्वचित् माहितींतील अपुरेपणाहि जाणवतो. मराठी वाङ्मयेतिहास-रचनेचा पहिला प्रयत्न न्या. रानडे यांचा. तसेंच पहिला सुसंगत वाङ्मयेतिहास लिहिण्याचें श्रेय 'भारतीय साम्राज्य'कर्ते कै. पावगी यांचें. परंतु या दोही ग्रंथांचा लेखन वा प्रकाशनकाल लेखकाने सांगितलेला नाही. विशेषतः इतिहासविषयक ग्रंथांबाबत हा कालोल्लेखाचा अभाव अधिक जाणवतो. 'रागिणी'सारख्या इ. स. १९२० च्या पूर्वी प्रसिद्ध होऊन गाजलेल्या कादंबरीचा उल्लेख या इतिहासांत आढळत नाही याचें कारण मात्र निराळें आहे. हा माहितींतील अपुरेपणा नव्हे, तर लेखकाने घालून घेतलेल्या काल-विषय-मर्यादा या प्रकारास जबाबदार आहेत. अर्थात् हाहि एक मतभेदाचा विषय होऊं शकतो.

असो. आदर्श इतिहासग्रंथ लिहिण्याच्या मार्गांत खाचखळगे व धोक्याच्या जागा किती आहेत याची थोडी कल्पना यावी एवढ्याच बुद्धीने प्रा. देशपांडे यांच्या ग्रंथांतील कांही उणिवा वर दाखविल्या. वास्तविक पाहतां त्यांच्या ग्रंथांतील गुणसमुच्चय इतका मोठा आहे, की त्याच्या आश्रयाला कांही बारीकसारीक दोष निकडून असतील असा संशयहि सर्वसामान्य वाचकाला येणार नाही. जरा खोलवर गेल्यास मात्र कांही गोष्टी बोचतात हें कबूल केलें पाहिजे. असो. या ग्रंथास व्यापून असणारा सर्वांत महत्त्वाचा गुण म्हणजे लेखकाची तन्मयता.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रा. देशपांडे या इतिहासरचनेंत खरोखरच रंगून गेले आहेत असा अनुभव वाचकास पदोपदीं येतो. विशेषतः चिपळूणकर, परांजपे, बालकवि इत्यादि त्यांच्या आवडत्या ग्रंथकारांवरील प्रकरणांतून दिसून येणारी त्यांची तन्मयता वाखाणण्यासारखी आहे. इतिहासाच्या या प्रथम खंडांत चिपळूणकरांचें एक व टिळक-आगरकरांचें एक अशीं दोन पर्वें लेखकानें कल्पिलीं असलीं तरी प्रा. जोग म्हणतात त्याप्रमाणे वस्तुतः हें पर्व एकच आणि तें चिपळूणकरांचें असल्याची जाणीव लेखकास आहे. किंबहुना प्रस्तुत खंड हा चिपळूणकरांना स्वस्थानीं बसविण्याचा प्रयत्न आहे असें म्हणणें अधिक युक्त ठरेल. उपेक्षितांना मानकरी करून खऱ्याखुऱ्या मानकऱ्यांची उपेक्षा करण्याच्या चालू जमान्यांत प्रा. देशपांडे यांनी केलेली ' विष्णुपूजा ' एका दृष्टीने स्वागतार्ह आहे. शास्त्रीबुवांच्या असामान्य कर्तृत्वाची मोहिनी लेखकांवर इतकी पडली आहे, की निबंधमालेचा परिचय करून देतांना ते लिहितात, " मालेच्या अंगीं असणाऱ्या गुणसंभारानें आम्ही स्वतः इतके भारून गेलों आहोंत, की आमची लेखणी तिच्यावर सतत स्तुतिसुमनांचा वर्षाव करण्याकरिता, तिच्या रसास्वादांत सदैव रममाण होण्याकरिता उत्सुकच राहिलेली आहे. " ( पृ. ३९ ). इतिहासकारानें इतकें आत्मनिष्ठ असावें काय हा प्रश्न कदाचित् विवाद्य होऊं शकेल. तसेंच या कलियुगांत देवाचें नांव घेणें हें महदाश्चर्य होय या कल्पनेनें एक कवि जसें म्हणतो, की " अकबर खुदाके नाम लेते है इस जमानेमें ", तसें प्रस्तुत लेखकानें केलेली चिपळूणकर-प्रशंसा वाचून कोणेकास आश्चर्य वाटण्याचाहि संभव आहे. परंतु श्रेष्ठास श्रेष्ठ म्हणणें यांत कांहीं गैर आहे असें आम्हांस वाटत नाहीं. प्रा. देशपांडे यांचा हा इतिहासग्रंथ वाचून खालीं ठेवल्यावर ' भलें केलें गा अच्युता ' असेंच बहुतेक सर्व वाचक म्हणतील, अशी आमची खात्री आहे.

—शं. गो. तुळपुळे.

भारतीय मानसशास्त्र अथवा सार्थ व सविवरण पातंजल योग दर्शन (लेखक- कृष्णाजी केशव कोल्हटकर; प्रकाशक- के. भि. ढवळे, मुंबई. पृ. सं. १०३५ मूल्य रु. १८ ).

योग हा भारतीय संस्कृतीचा विशेष वारसा व मूल्यवान् अलंकार आहे. तरीहि ह्या विषयाची अभिरुचि फारच क्वचित् आढळते. कारण योगाविषयी तो गूढ, अद्भुत, अवघड व अनाकलनीय आहे अशा अनेक अनाठायी गैरसमजुती पसरल्या आहेत. तत्त्वज्ञानाचे बहुतेक प्राध्यापक लेखन, अध्ययन, स्वाध्याय व संशोधन ह्यांपासून अलिप्त राहिलेले दिसतात व जे कांहीं थोडे लेखन करतात त्यांच्यापैकीहि कांहीं लघुकथा-कादंबऱ्यांच्या लेखनांत गुंतलेले दिसतात. अशा परिस्थितींत विमा-कंपनींतून सेवानिवृत्त झाल्यावर सतत १२ वर्षे योग विषयावरील संस्कृत, इंग्रजी व मराठी ह्या भाषांतील ग्रंथांचें आलोचन करून, तसेंच प्रत्यक्ष ध्यानधारणांचा अभ्यास करून हजारावर पानांचा जाडा ग्रंथ महाराष्ट्रीय वाचकांस सादर केल्याबद्दल श्री. कोल्हटकर ह्यांचें जितकें अभिनंदन करावें तितकें थोडेंच होणार आहे. योगदर्शनावर इतका मोठा ग्रंथ आजवर मराठींत झाला नाहीं हें कोणालाहि प्रांजलपणें कबूल करावेंच लागेल.

कैवल्यप्राप्तीची उत्कंठा आणि मोक्षाची ओढ ही जरी सांप्रत योगाच्या अभ्यासाला कारणीभूत होण्यासारखी नसली तरीहि व्यक्तित्वविकासाचें ध्येय आणि त्यासंबंधीचे नैतिक कर्तव्य हीं सुद्धा आधुनिक मनुष्याला योगाकडे प्रवृत्त करण्यास पुरेशीं आहेत. कारण योग व्यक्ति-



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

त्याचा पूर्ण विकास करतो, सुप्त शक्तींची पूर्ण वाढ करतो. सर्वसाधारण मनुष्यामध्ये असलेल्या शक्तींपैकी फक्त शेकडा दहा इतक्या थोड्याच शक्तींची वाढ झालेली असते असें मानसशास्त्रज्ञांचें मत आहे. ह्या दृष्टीने साधन-पादांतील यमनियमांचें फार महत्त्व आहे. म्हणून श्री. कोल्हटकरांनी अहिंसा, सत्य इत्यादि सामाजिक संबंधांच्या नियंत्रणावर विशेष भर दिलेला आहे तो योग्यच आहे. अहिंसाव्रताचें शंभर टक्के पालन करणें म्हणजे आध्यात्मिक उन्नतीच्या मार्गावरील अर्ध्याहून अधिक टप्पा गाठण्यासारखें आहे. खरा अहिंसावादी हा परपीडेपासून परावृत्त असतो, एवढेंच नव्हे तर तो निर्वैर उसतो, निर्द्वेषी असतो किंबहुना सर्व मानवांवर प्रेम करणारा असतो! ब्रह्मचर्याविषयी त्यांनी विशेष विस्तृत विवेचन केलें आहे. ह्या विषयाची चर्चा इंद्रियविज्ञानशास्त्र, आरोग्यशास्त्र, समाजशास्त्र इत्यादि अनेक शास्त्रांच्या आधारें केलेली आहे. एकतत्त्वाभ्यासाच्या परिकर्मांपैकी 'प्रच्छर्दनविधारणाभ्याम् वा प्राणस्य' ह्या प्राणायामपरिकर्मांच्या विवेचनांत रेचक आणि कुंभक चित्तप्रसादाला कसे कारणीभूत होतात हें सांगतांना श्वसनक्रियेच्या शारीरशास्त्रीय विश्लेषणाची योग्य मदत घेतली आहे. अशा तऱ्हेची विवेचनपद्धति अगदी आधुनिक आणि विशेष स्वागतार्ह आहे असेंच कोणीहि म्हणेल.

पातंजल योगसूत्रांच्या विभूति-पादांतील सिद्धींचें वर्णन हें पुष्कळांना अद्भुतरम्य वाटतें. 'अरेबियन नाइटस्' मधील 'तिळा दार उघड' इत्यादि प्रकार वाचल्यानंतर ज्या तऱ्हेची वाचकाची मनःस्थिति होते तशाच तऱ्हेची उल्हसित आणि आनंददायक मनःस्थिति संयमाने प्राप्त होणाऱ्या निरनिराळ्या सिद्धींचें वर्णन वाचतांना होते. योगाकडे आकर्षित करण्याकरता हीं आमिषें दाखविलीं आहेत की काय असाहि किंचित् भास होतो. परंतु त्याठिकाणीं हें लक्षांत ठेवणें अत्यंत आवश्यक आहे की, कोणत्याहि बाबतींतील खऱ्याखोट्याबद्दलचा निर्णय, साधना न करतां, अनुभव न घेतां, प्रयोग करून न पाहातां, घेणें हें अशास्त्रीय आहे. जें अनुभवसिद्ध आहे त्याच्याबद्दल अभ्यासाशिवाय आणि अनुभवाशिवाय अनुकूल अथवा प्रतिकूल निर्णय देण्याची घाई करूं नये. श्री. कोल्हटकरांनी ह्याविषयी जी चर्चा केलेली आहे ती शक्य तितक्या बुद्धिवादी विचारसरणीने केलेली आहे. प्रत्येक ठिकाणीं 'कां' व 'कसें' अशा जागरूक मनोभूमिकेवरून ह्या सर्व विषयांचें विवेचन केलें आहे. सिद्धींचे दोन प्रकार पडतात. एक प्रकार असा आहे की त्या प्रकारांतील सिद्धींची मीमांसा मानसशास्त्रीय दृष्ट्या होऊं शकते. जसें अतीत-अनागत ज्ञान; सूक्ष्म-विप्रकृष्ट ज्ञान; परचित्तज्ञान. ह्या सिद्धींविषयी अद्भुत किंवा अनैसर्गिक असें कांही नाही. कांही व्यक्तींना ह्या सिद्धी जन्मप्राप्त असतात तर कांहींना त्या प्राप्त करून घेतां येतात. फक्त अवघड अट आहे तो अभ्यासाची, प्रयत्नांची. पतंजलीचें असें आग्रहाचें, किंबहुना, आव्हानपूर्वक सांगणें असें आहे की "मीं सांगितलेल्या पद्धतीने कोणीहि अविकृत ( normal ) मनुष्य ( मग तो स्त्री असो अगर पुरुष असो, गरीब असो अगर श्रीमंत असो, हिंदू असो अगर ख्रिश्चन ज्यू कोणीहि असो) प्रयत्न आणि अभ्यास करील तर तो निश्चयाने आपल्या मानसिक शक्ती वाढवून सिद्धी प्राप्त करून घेऊं शकेल. सँडो, गामा, किंगकाँग यांनी ज्याप्रमाणे पद्धतशीर आणि चिकाटीचा प्रयत्न करून अलौकिक शारीरिक सामर्थ्य संपादन केलें त्याचप्रमाणे कोणीहि व्यक्ति अभ्यासाने अलौकिक मानसिक सामर्थ्य संपादन करून घेऊं शकेल. दुसरा प्रकार अणिमा, लघिमा इत्यादि महासिद्धींचा. त्यांच्याविषयी मनांत शंका येणें साहजिकच असलें तरी अभ्यासाशिवाय, अनुभवाशिवाय निर्णय घेणें अशास्त्रीय आहे. ह्या बाबतींत योगशास्त्राची अशी ठाम, अगदी हिमालयासारखी अचल



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

खात्री आहे की मनाच्या सामर्थ्याच्या वाढीने पंचमहाभूतांवर जय मिळवितां येतो. मन (mind) भौतिक द्रव्यावर (matter) विजय मिळवूं शकतें.

भारतीय व पाश्चात्य मानसशास्त्रांतील साम्य व भेद ग्रंथकर्त्यांने कसोशीने दाखविले आहेत. व्यक्तीच्या जागृत, ज्ञात मनापलीकडे, सुप्त व अज्ञात मन असतें. जाणिवेच्या पलीकडे नेणीव असते. ही समजूत दोन्ही मानसशास्त्रांना साधारण आहे. फरक आहे तो फक्त ह्या अज्ञात मनाच्या, नेणिवेच्या स्वरूपाविषयी व त्यांतील सामग्रीविषयी. पाश्चात्यांचें मानसशास्त्र औपचारिक अर्थाने Psychology म्हणजे Psyche चें शास्त्र आहे तर भारतीय मानसशास्त्र अथवा योगदर्शन हें खऱ्या अर्थाने Psychology आहे, म्हणजे Psyche चें जीवात्म्याचें शास्त्र आहे. पाश्चात्यांचें मानसशास्त्र Psychology without a soul, a soulless Psychology म्हणजे आत्मरहित निरात्म (Soulless) मानसशास्त्र आहे. भारतीय मानसशास्त्र पूर्वजन्म मानतें; पाश्चात्य मानसशास्त्र पूर्वजन्म मानीत नाही. अशा तऱ्हेचे दोन्ही मानसशास्त्रांतील भेद उत्कृष्ट रीतीने स्पष्ट केले आहेत. १ क्षिप्त, २ मूढ, ३ विक्षिप्त, ४ एकाग्र, आणि ५ निरुद्ध ह्या चित्ताच्या भूमिकांनुसार मानसशास्त्रांतील शाखांना अनुक्रमें (१) नॉर्मल, (२) सब–नॉर्मल (३) ॲब–नॉर्मल (४) हायर; आणि (५) मेटॅसायकॉलजी अशीं नांवें कुशल आणि योग्य रीतीने त्यांनी सुचविलीं आहेत व पुढे असेंहि सांगितलें आहे की, त्यांपैकी पहिल्या म्हणजे क्षिप्त भूमिकेवरील मनःप्रक्रियांचें विवेचनच पाश्चात्य मानसशास्त्रांत प्रामुख्याने केलेलें आहे. दुसऱ्या व तिसऱ्या प्रकारांचें पाश्चात्यांचें विवेचन अधिक चिकित्सापूर्वक व विस्तृत केलें आहे व पौरस्त्यांचें विवेचन अधिक मूलग्राही व सोपपत्तिक आहे, आणि चौथ्या व पांचव्या प्रकारांचें विवेचन पाश्चात्यांनी अत्यल्प व चांचपडत केलें आहे; उलट पौरस्त्यांचें विवेचन समर्पक, सोपात्तिक व अनुभवाधिष्ठित आहे. उभय मानसशास्त्राप्रमाणे सहज प्रवृत्तीसंबंधी (Instincts) कसा भेद आहे तेंहि त्यांनी चांगलें दाखविलें आहे. २३२ पानांच्या विस्तृत भूमिकेंतील सर्वच विषय संक्षिप्त स्वरूपांत येऊन गेले आहेत. तरीहि त्यांतल्या त्यांत परिच्छेद ५ ते १२ ह्यांतील पाश्चात्य व भारतीय मानसशास्त्राच्या तुलनेंतील साम्यभेदांची चर्चा फारच उद्बोधक झाली आहे. ती मानसशास्त्राच्या अभ्यासकांना विशेष उपयुक्त होईल ह्यांत विलकुल शंका नाही.

भारतीय मानसशास्त्र म्हणजेच योगदर्शन ह्या सरळ समीकरणाबद्दल कांही मानसशास्त्रज्ञांत मतभेद असणें शक्य आहे. योगदर्शनांत जरी मनाचें स्वरूप व त्याच्या वृत्ति, प्रक्रिया यांसंबंधी निश्चित सिध्दांत असले तरी भारतीय मानसशास्त्र म्हणजे योगदर्शन व योगदर्शन म्हणजे भारतीय मानसशास्त्र असें समीकरण मांडणें बरोबर होणार नाही. योगदर्शनाला "आध्यात्मिक मानसशास्त्र" ("Spiritual Psychology") म्हणजे आध्यात्मिक ध्येयप्राप्तीकरता विनियुक्त केलेलें मानसशास्त्र, Psychology applied to spiritual end or purpose असें समजणें जास्त सयुक्तिक होईल. भूमिकेंतील उत्कृष्ट तौलनिक विवेचन वाचल्यानंतर विवरणांतहि योग्य प्रसंगांनी कांही विषयांच्या विवेचनांत तौलनिक पद्धति वापरली असती तर तें अधिक उपयुक्त व उद्बोधक झालें असतें असें वाटतें. उदाहरणार्थ, संप्रज्ञात समाधीच्या सवितर्क, सविचार, सानंद, सास्मिता, ह्या पायऱ्यांचें त्यांनी केलेलें उत्कृष्ट विवेचन वाचल्यानंतरहि मनोमूर्तींना (Mental images) ह्या चार अवस्थांत कांहीच स्थान नाही काय ही प्रामाणिक शंका राहातेच. असो.

श्री. कोल्हटकरांनी योगदर्शनावरील मराठी वाङ्मयांत ह्या ग्रंथाने अत्यंत बहुमोलाची

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मर घातली आहे त्याबद्दल महाराष्ट्रीय वाचकवर्ग त्यांचा नेहमी ऋणी राहील. शेवटीं, ह्या विषयाच्या अभ्यासाला त्यांच्या ग्रंथामुळे चांगली चालना मिळेल अशी आशा करतों.

दा. ग. लोंढे

**हिमअङ्गार**— [ कवितासंग्रह. कवि–राजकवि रा. अ. काळेले. ३६, हमारी कॉलनी, इंदूर; मूल्य रु. ३॥, पृष्ठें ११८ ].

महाराष्ट्रीय रसिकांच्या पूर्वपरिचयाचे इंदूरचे सुप्रसिद्ध राजकवि श्री. रामचंद्र अनंत काळेले यांचा हा पांचवा कवितासंग्रह आहे. या संग्रहांत त्यांच्या एकूण ७३ कविता संग्रहित करण्यांत आल्या आहेत. या कविता त्यांनी त्रेचाळीस तें त्रेपन्न या दशकांत लिहिलेल्या आहेत. चौपन्नच्या फक्त ७ कविता आहेत. तेव्हा त्रेचाळीस तें त्रेपन्न या दशकांतील जागतिक क्रांतीचे सूर त्यांच्या या कवितांतून उमटावेत हें साहजिकच आहे. स्वतः ते ज्या विभागाचे रहिवाशी आहेत तो विभाग या काळांत भारतीय गणराज्यांत विलीनीकरण पावला ही घटनाच त्या क्रांतीची एक महत्त्वाची साक्ष आहे. त्यांच्या विभागांत या विसाव्या शतकांतहि कांही मध्ययुगीन अवशेष अस्तित्वांत होते. परंतु स्वतंत्रतेच्या या नवोदित युगांत आता ते कुठल्या कुठे नाहीसे होत आहेत. प्रत्यक्ष जीवनांत झालेलें हें अभूतपूर्व परिवर्तन श्री. काळेले यांच्या कविताकृतींत प्रतिबिंबित झालें आहे. त्यामुळे या त्यांच्या कवितासंग्रहास ऐतिहासिक महत्त्व प्राप्त झालें आहे.

त्रेचाळीस तें त्रेपन्न या दशकांत वंशवाद, साम्राज्यवाद, साम्यवाद व लोकसत्तावाद यांचा संघर्ष कमीअधिक प्रमाणांत चालू होता. अजूनहि तो स्थिरावलेला नाही. ज्या समाजांत आर्थिक विषमता असेल, त्यांत वर्गविग्रह अपरिहार्य आहे. संपन्न वर्गाने विपन्न वर्गाच्या श्रमाचीं फळें चाखावयाचीं हा अन्याय यापुढे चालणार नाही. विपन्नांनी कष्ट करावयाचे आणि संपन्नांनी त्याद्वारें निर्माण झालेल्या संपत्तीचा उपभोग घ्यावयाचा हा एक घोर सामाजिक अत्याचार आहे. दारिद्र्य, दैन्य, दास्य आणि अज्ञान यांमुळे विपन्नांना स्वतःच्या प्राथमिक गरजाहि भागवतां येत नाहीत. त्यांना शरीरपोषणासाठी धड अन्न मिळत नाही. त्यामुळे त्यांची उपासमार होते. आणि ते चोऱ्या करण्यास सोकावतात. त्यांच्यावर शिक्षणाचे संस्कार नसल्यामुळे गुन्हेगारी हाच त्यांचा व्यवसाय बनतो. त्यांना निवाऱ्याची जागा नसते म्हणून तुरुंगालाच ते आपलें घर समजतात. यदाकदाचित् त्यांना पोट जाळण्यासाठी अन्न मिळालें तरी तें दूषित असतें. त्यामुळे ते रोगास बळी पडतात; आणि समाजांतहि त्या रोगाची साथ पसरते. त्यांना धडाचें अंथरूण पांघरूण नसतें. त्यामुळे निसर्गच काय तो त्यांचा त्राता असतो. तेव्हा समाजांतील सत्ताधाऱ्यांनी, मत्तावाल्यांनी आणि बुद्धिमंतांनी नवनिर्माणांत सामाजिक पुनर्घटना करतांना समाजावरील हा कलंक पुसून टाकणें आवश्यक आहे हा विशाल आशय हा त्यांच्या कवितासंग्रहांत काठोकाठ भरला आहे. हा कवितासंग्रह चाळतांना अन्नासाठी, जुने जोडे, येत्र आले, कोहिनूरा, उसळली लाट्, भडकूं दे ज्वाला, खुपस तव पातें, आला महापूर, अमचें तुमचें, अमच्या काळांत, मोलकरणीचा पोर, त्यांनीं केली चळवळ, जुन्या पुराण्यांचा वाडा, हा रिक्षावाला, अरे अरे कळसा, चिखल म्हणाला—यांपैकी कोणतीहि एक कविता वाचली तरी तो आशय चटकन् मनावर ठसल्याशिवाय राहणार नाही. काळेल्यांच्या

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

या कविता केवळ सांप्रदायिक नाहीत. त्या त्यांच्या नाभीच्या देठापासून बाहेर उफाळल्या आहेत. दरिद्रीनारायणाच्या घामाच्या दामावर गबर होऊन पुण्यप्राप्तिस्तव त्यांना भोजन घालणाऱ्या एका नवकोटनारायणास उद्देशून ते संतापाने लाल होऊन उद्गारतात,—

कंगाल ते जंतु
अहा रे कुत्र्याच्या हिरीरीने कसे तुटून पडले
अन्नकणांवर !
अरेरे,
माणसाच्या दुनियेंतील का माणसें हीं ?
त्या दानशूरा मिळे दुवा
हन्त रे
कोणीच का शाप नाही दिला त्याला—
जो बने स्वतः एक नारायण
कैकांचा बनवून नरश्वानें ?

अन्यायासंबंधींची

ही चीड काळेल्यांच्या रक्तांत आहे. परंतु व्यक्तिगत अन्याय व्यक्त करतांना ती संतापाच्या रूपाने अवतीर्ण न होतां विनोदाच्या आड पडद्याने व्यक्त होते. काळेल्यांना व्यवसायानिमित्त ज्या विभागांत वावरावें लागलें तेथील अहंमन्य, अदूरदृष्टि व संकुचित राजकीय वातावरणांत त्यांच्या स्वाभिमानी, निःस्वार्थी व व्यापक मनाचा अनेकवेळां कोंडमारा झाला. त्याचा विस्फोट स्मिताची लाघवी छाया, ओहळास, ध्वजा तव मर्म समजलें—अशा कांही कवितांत झाला आहे. या कविता अन्योक्तिपर आहेत. त्यामुळे दिसावयास रोख भलतीकडे दिसला तरी छर्रा मात्र ज्या मर्मस्थलांत जाऊन रुतावयाचा तेथे बरोबर घुसला आहे. काळेले ध्वजाला उद्देशून ज्यावेळीं म्हणतात,—

ध्वजा ! असषि तूं केवळ फडकें
परी तेंच तव वैभव फडकें
सखया रे मी वळलें वळलें
गुप्तसिद्धि ही कशी !
सेवाधर्म कळे रे तुजसी
तोच छान तूं नित आचरसी
चतुरा रे–तूं पाठ फिरविसी
वारा वाहिल तशी !

त्यावेळीं, साधारण योग्यतेचा परंतु प्रसंगानुरोधाने वागणारा एकादा हांजीहांजीखोर संस्थानी अधिकारी त्यांच्या औपरोधिक टीकेचें लक्ष्य आहे हें लक्ष्यांत आल्याखेरीज राहात नाही.

काळेल्यांच्या या कवितासंग्रहांतील कवितांचें स्वरूप प्रामुख्याने दोन प्रकारांचें आहे. यांतील कांही कविता भावनिका आहेत आणि कांही चिंतानिका आहेत. भावनिका गेय आहेत आणि चिंतानिका अगेय आहेत. भावनिकांचें स्वरूप संवेदनात्मक आहे, तर चिंतनिकांचें स्वरूप निवेदनात्मक आहे. भावनिकांचा हळुहळू होणारा उन्मेष हळुवार हृदयाच्या कोषांत झालां आहे. उलट चिंतनिकांचा सावेश उद्रेक मस्तिष्कामधूनं झाला आहे. कवितांचे हे दोन्ही प्रकार सारखेच सुंदर आहेत. भावनिकांत रस आहे, तर चिंतनिकांत कस आहे. रस

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अनुक्रमणिका

आणि कस दोन्ही आवश्यक आहेत. त्यांत उणाअधिक असा भेदभाव करण्याचें कारण नाहीं. काळेल्यांना हे दोन्ही प्रकार सहज साधतात. या म्हणण्याचा प्रत्ययच हवा असेल तर तुझ्या निश्वासावांचून, कुणी कुठून बांधले, एक एक गळुन पान, हिमअङ्गार, शिखर, हाहि मानव आहे, या त्यांच्या कविता एकवार नजरेखालून अवश्य घालाव्या.

काळेल्यांच्या पूर्वीच्या कवितासंग्रहांतील प्रेमगीतांच्या मानाने या कवितासंग्रहांत प्रेमगीतें संख्येने कमी आहेत पण गुणाने विशेष आहेत. काळेले जसे जन्मसिद्ध तसेच स्वयंसिद्ध कवि आहेत. त्यांच्या प्रतिभेवर संस्कृत व इंग्रजी साहित्याचे शुभ संस्कार झाले आहेत. त्यामुळे आशय, अभिव्यक्ति आणि आकार यांचें सामग्र्य आणि सामंजस्य यांनी युक्त अशी नवकविता ते रसिकांच्या हातांत देतात. उगीच टूम म्हणून ते कविता लिहीत नाहीत. कविता म्हणजे एक फूल आहे. फुलाप्रमाणेच ती आपोआप फुलते. फुलांत कुणी गंध ओततो का? किंवा त्याच्या पाकळ्यांच्या कडांना कुणी रंग देतो का? फूल फुलतांच त्याच्या ठिकाणीं त्यांचाहि उद्‌भव होतो. कवितेचें तसेंच आहे. तिचा आशय, अभिव्यक्ति आणि आकार यांचा एकजीव असतो. त्यांना एकमेकांपासून विलग करतां येत नाही. किंबहुना या त्रयीचें एकत्रीकरण म्हणजेच सौंदर्य. सौंदर्य म्हणजे कवितेचा प्राण आहे. काळेल्यांच्या कविताकृतींत या सर्वांचें सम्मीलन झालें आहे. शिखर या चिंतनिकेंत त्यांनी निसर्ग आणि मानव यांचा मोठा मजेदार संघर्ष दाखवला आहे. प्रयत्नवादी मानव आणि निर्गुण निसर्ग यांचीं चित्रें त्यांनी अतिशय कौशल्याने रेखाटलीं आहेत. तीं पाहतांना काळेल्यांच्या प्रतिभेबद्दल आदर वाटतो. शिखर या कवितेंत ते तेनसिंगाला विचारतात,—

एव्हरेस्टाच्या टोकावरती
तुला तेनसिंगा चढलेला पाहुन
हिमनग हसला का रे,
-की रुसला? की नुसता बसला?

आणि, मग म्हणतात,—

अचल हिमाचल बसला होता
डोक्यावरती बर्फ ठेउनी
डोक्यावर कांही खाजवलें
त्यास वाटलें
शंकरजीचा धवळा नंदी
बर्फ खुराने असेल खोदत,

आणि, पुढे ओघांत सहज टीका करतात,—

"करिल काय तें बर्फ बिचारें?
बर्फापेक्षा बर्फ—
आमचीं हृदयें झालीं आहेत!
बर्फाला गोठवील
—मानव!"

सारांश, हिमअङ्गार या कवितासंग्रहाने मराठी वाङ्मयांत एका मोलाच्या व महत्त्वाच्या ग्रंथाची भर पडली आहे. त्याबद्दल श्री. काळेले हे धन्यवादास पात्र आहेत.

—भ. श्री. पंडित.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

चितेच्या प्रकाशांत—(दीर्घ प्रेमकाव्य)–[ कवि डॉ. श्रीराम अत्तरदे · प्रमुख विक्रेते एन्. व्ही. कोल्हे. सोमेश्वर बुकडेपो. अमरावती. मूल्य रुपये २. पृष्ठसंख्या ११५ ]

हें एक प्रदीर्घ काव्य आहे. त्याची उभारणी प्रेमभावनेवर झाली आहे. तें प्रेमहि तरुण-तरुणींतील आहे. त्यामुळे या काव्यांत एक प्रकारच्या उद्दाम उत्कंठेचा व उत्कटतेचा संचार झाला आहे. मात्र या काव्यास सलग व सुसंगत असें कथानक नाही. या काव्याचे विलग व विस्कळित असे निरनिराळे पदर आहेत; आणि ते कर्त्यांने कसेबसे गुंफण्याचा प्रयत्न केला आहे. तो अर्थातच बादरायणसंबंधासारखा आहे. काव्याचें कथानक पुढीलप्रमाणे आहेः—

एक तरुण कवि असतो. अध्यापन हें त्याच्या चरितार्थाचें साधन असतें. ऐन उमेदींतील वयांत त्याला भोवतालच्या जगाचा कटु अनुभव येतो. जगांत जिकडे तिकडे स्वार्थ आणि दंभ आहे. समाजांतले लब्धप्रतिष्ठित हे अहंमन्य व मत्सरी असून माणुसकीला पारखे झालेले आहेत. बहुजनसमाज हा अज्ञान, अशिक्षित, दुबळा, नेभळा आणि गबाळा आहे. समाजांत सुशिक्षित–अशिक्षित, गरीब-श्रीमंत, श्रेष्ठ-कनिष्ठ असें वैषम्य आहे. त्यामुळे अन्याय आणि अत्याचार यांनी गोंधळ घातला असून ममता, समता, नीति इत्यादि उदार व उदात्त तत्त्वांनी पलायन केलें आहे. या काव्याच्या नायकाच्या वाट्याला या सामाजिक अन्यायाचीं दारुण दुःखें आलेलीं असतात. तो दलित समाजांत जन्मलेला असतो. येशू ख्रिस्त, मार्टिन ल्यूथर, गोपाळ गणेश आगरकर, श्रीधर व्यंकटेश केतकर आदि समाजसेवक त्याचे आदर्श असतात. त्याने स्वतः मागील महायुद्धांत ब्रह्मदेशांतील आझाद सेनेच्या लढ्यांत भाग घेतलेला असतो. वंशवादी बुभुक्षित 'म्युनिक' ला श्रमजीवि 'स्तालिनग्राद' ने परास्त केल्याचें जिवंत उदाहरण प्रत्यक्ष त्याच्यापुढे असतें. या सर्वांकडून प्रेरणा घेऊन तो समाजाचा उद्धार करण्याकरिता बद्धपरिकर होतो. परंतु भोवतालच्या जनतेने त्याला दुखावलेलें असतें. त्याचा अपमान झालेला असतो. तिने त्याच्या सत्प्रवृत्तीस असत्प्रवृत्ति आणि सत्कृत्यास दुष्कृत्य ठरविण्याचा खटाटोप केलेला असतो. त्यामुळे तो हताश बनलेला असतो. अंतःकरणाच्या अशा दयनीय दशेंत त्याला एका तरुणीच्या प्रेमाचा ओलावा लाभतो. ती प्रेयसी त्याच्या जीवनांत स्थित्यंतर घडवून आणते. ती त्याच्या स्थिरजीवनांत संजीवन ओतते. त्या जाणिवेने तो उद्गारतो—

वैराग्य लोपलें, अंगि संचरे स्फूर्ति,  
नयनांत सदोदित तुझी विराजे मूर्ति;  
साजिरें अभावित भाग्यच हाता आलें;  
तें माझें सामावलें तुझ्यांतच विश्व,  
माझ्यास्तव फुटले आनंदाचें पेव.

हा काव्यनायक समाजकार्यार्थ वर्गणी गोळा करण्यास गेला असतांना एका माया-विनीच्या मोहजालांत गुरफटतो. त्यामुळे त्याची बदनामी होते. परंतु या नवीन प्रेयसीच्या आगमनाने त्याच्या उत्साहाला व उल्हासाला अदम्य भरतें येतें. जग हें अनिश्चित आहे आणि आयुष्य निराशेने व्याप्त आहे. तेव्हा मनुष्य कार्यप्रवण व्हावा यासाठी प्रेम आवश्यक आहे. तो नायक म्हणतो,—

जग अनिश्चितीचें हताशतेचें धाम ·  
त्यानेच निर्मिला सुखालु उमर खयाम !



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

उन्मत्त प्रीतिचा प्याला दे मज पेला;

आणि, मग त्या प्रीतीची महती वर्णन करतांना तो उद्गारतो,—

तो जगला, ज्याने प्रेम एकदा केलें;
.तो मेला, ज्याने प्रेम कधींहि न केलें;
वंचित जो तो तर साफ बुडाला—गेला—;
बेइमान ज्याची प्रीति तोच हैवान—
भंगितो दुज्यांचें प्रेम तोहि सैतान !

या काव्याच्या आरंभीं नायकानें त्या प्रेयसीच्या सहवासांतील व विरहांतील प्रसंगांचें स्मृतितरंगांच्या रूपानें ढंगदार व रंगदार वर्णन केलें आहे. कधी तो वर्गांत शिकवत असतांना त्याला समोरच्या खिडकींतून तिच्या वेणीचें दर्शन होतें. कारण ती तेथे पाठमोरी बसलेली असते; तर कधी ती पाणी पिण्याचा तांब्या आपल्या हातांत घेऊन येते व त्याला देते. त्यावेळीं तो तांब्यावरील तिचीं बोटें प्रेमाने दाबतो. अशीं अनेक गमतीचीं प्रणयचेष्टितें सुरुवातीच्या विभागांत आलीं आहेत. पुढच्या एका भागांत ग्रामीण पार्श्वभूमीवर रेखाटलेलीं शब्दचित्रें आहेत. तीं अधिक मनोरम आहेत. कदाचित् कर्ते हे खानदेशांतील ग्रामीण भागांतील रहिवाशी असल्यामुळे त्यांना त्यांत उठावदार रंग भरणें सहजगत्या साधलें असावें. शिवाय ही ग्रामभूमि वर्णन करतांना कितीतरी नवीन शब्द उचंबळून बाहेर आले आहेत. ते 'ग्राम्य' असले तरी 'नागर' रीतींत मोठ्या चपखलपणें बसले आहेत. पावसाळ्याचें आणि पेरण्यांचें वर्णन आहे,—

"रे चिकार झाला पाउस, वाफ न होतीं,
पेरणी करुं उद्या." म्हणून सांगत येती.
मग हळूच शेंड्यावरुनी येइ पुकार—
"हो कुणबी राजा ! कुणबी राजा ! या रं !—
जल्दीच करा जल्दीच—पेरते व्हा रं !"
धरतीच्या पोटीं संभवेल नवनवती
मउ ओलाणींतुन बैल झपाझप जाती
नवजन्मासाठी आतुरता किति विश्वीं !
चाहींत वियाणें ओढुन घेई माती
मग तिफणीमागुन फिरे वरून फसाटी;

कवीने काव्याचा शेवट नायकाच्या प्रेयसीच्या मृत्यूंत केला आहे. नायक तिच्या चितेच्या प्रकाशांत समाजसेवेस सिद्ध होतो. काव्याच्या शेवटच्या विभागांत मागील महायुद्ध झालें असून आता जीर्ण जगाचा नायनाट झाला आहे आणि नवें जग जन्माला आलें असून त्यांत मानवाचा संपूर्ण विकास होणार आहे अशी आशा प्रकट केली आहे.

कवीच्या भावनेंत तेज आणि भाषेंत ओज आहे. त्यांमुळे काव्य परिणामकारक झालें आहे. परंतु कित्येकदा भावनेचा ओघ अनावर झाल्यामुळे काव्यदोष उद्भवले आहेत. 'अर्पणपत्रिकें'तच 'विद्रोह, वंचना साहत ऐन वयांत' अशी एक ओळ आहे. तींत वंचना सहन केली हा प्रयोग बरोबर आहे; पण विद्रोह सहन केला म्हणजे काय केलें तें कळत नाही. पृ. १० वर प्रीतीवर बंदुकीच्या गोळीचा आरोप केला आहे तो अयोग्य आहे. पृ. १४ वर 'फिटुर वस्त्रहि होई' असा प्रयोग आहे, तो अशिष्ट आहे. त्याचप्रमाणे पृ १७ वर 'निश्चेष्ट पहुडलों कुत्र्यापरि वाटेंत' असा प्रयोग आहे. तो अनुचित आहे. कवीची जगाकडे पाह-

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

ण्याची दृष्टि निर्दोष वाटत नाही. या काव्यांत जागोजागीं ' जनकिडे ' ' गांडगुळें ' ' कुत्रें ' ' टिनपॉट ' असलीं गालिप्रदानें आलीं आहेत. या प्रदीर्घ प्रेमकाव्यांत प्रेमभावनेपेक्षा क्वचित् कामविकाराचें प्राबल्य झाल्यामुळे हा दोष उद्भवला असावा. प्रेम हें उत्कट असलें तरी उपशामक असतें. पृ. २५ वर आठव्या एडवर्डच्या राज्यत्यागाची प्रशंसा असून प्रणयाचें गौरव केलें आहे. परंतु इंग्लंडसारख्या प्रागतिक राष्ट्रालाहि तो प्रणय गौरवास्पद वाटला नाही हें लक्ष्यांत घेणें आवश्यक आहे. डॉ. अत्तरदे यांच्या या काव्यांतला नायक प्रत्यक्ष असें कार्य कोणतें करतो तें मात्र शेवटपर्यंत कळत नाही. तो प्रणय करतो, प्रणयाचीं सूक्तें गातो, निसर्गाचें स्तोत्र आळवितो आणि मानवतेवर प्रवचनें देतो हें खरें. परंतु प्रत्यक्ष आचरण कोणतें करतो हें मात्र या काव्यांत नाही.

डॉ. अत्तरदे यांची प्रतिभा उज्ज्वल आणि लेखणी चपल आहे. त्यांचीं अनेक काव्यें प्रसिद्ध झालीं आहेत. आणि अनेकांचा त्यांनी संकल्प सोडला आहे. यापुढील काव्यांत त्यांनी आदर्शभूत नायक निर्माण करून तो महाराष्ट्रास स्फूर्तिप्रद ठरेल असा प्रयत्न करावा अशी स्नेहभावाची सूचना करून हें समीक्षण आवरतें घेतों.

—भ. श्री. पंडित.

**अत्तरदाणी**—( कवितासंग्रह ) [ कवि—डॉ. प्रा. श्रीराम अत्तरदे, श्रीशिवाजी कॉलेज, अमरावती पृ. १२४ किं. ३ रु. ]

मराठीचे नवोदित छंदःशास्त्रकार डॉ. अत्तरदे यांच्या प्रामुख्याने १९४८ ते १९५३ या काळांतील निवडक कवितांचा हा संग्रह आहे. डॉ. अत्तरदे हे कवि या नात्याने 'प्रथितयश' झालेले नसले तरी त्यांचा हा संग्रह अनेक दृष्टींनी वैशिष्ट्यपूर्ण आहे व आधुनिक मराठी काव्य-संग्रहांत एक मानाचें स्थान मिळविण्याच्या योग्यतेचा आहे.

पुस्तकाचें नांव कविनामाशीं जुळणारें घेतलें असलें तरी त्यांत कवीच्या जीवनांतील भावानुभवांचें सार असल्यामुळे व विशेषेंकरून प्रेमभावनेचा उन्मादक हृद्‌गंध त्यांत भरून राहिला असल्यामुळे डॉ. अत्तरदे यांची ' अत्तरदाणी ' सार्थनामा ठरली आहे. 'मनाची मंजूषा' या कवितेंत खुद्द कवीने आपली प्रेमविषयक कल्पना साठवून ठेवली आहे ती अशी —

अंतरीं जपेन इमानें या सहानुभावा—
जीवित–प्रवासिं शिदोरी हीच नित्य जीवा—
गे तुझ्या स्मृतींतच दुनियेपार पाय जावा
बेइमान, दुनियेसाठीं नको दोष अंगीं.

अर्थात् कवीच्या स्मृतिरूप सहानुभावांची, त्याला आपल्या भावजीविताच्या प्रवासांत उपयोगी पडणारी शिदोरी शब्दबद्ध केली आहे. कवीच्या प्रेमस्मृतीचा सुवास अत्तरदाणींत मंजूषास्थित केलेला असला तरी तो रसिक वाचकांच्या मनांतहि गंधोर्मी निर्माण करतो. या संग्रहांत बहुसंख्य कविता प्रेमविषयक आहेत. ' मेला कवितेसाठी' या कवितेंत कवीने 'रोजगार अन् तहानभूकहि तुझ्यामुळे विसरतों ' व 'तुझ्या संभवीं साफल्याचि मज गमे जीविताचें–गावतें निधान चित्सौख्याचें ' असे उद्‌गार काढलेले असले तरी अशा उत्कट भावनांच सहजोद्‌गार हें कांही या कवीचें अनन्य वैशिष्ट्य नव्हे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रेमाची भावना कवीच्या अंतर्वृत्तींत दडून तिचे भावगर्भ पडसाद ध्वन्यर्थाने किंवा सूचक प्रतीकयोजनेने व्यक्त करण्यास आवश्यक अशी आत्मपरता डॉ. अत्तरदे यांच्या व्यक्तित्वांत नाही. याला कोणी दोष म्हणो की गुण म्हणो. दोष असा की, त्यांच्या काव्यांत अशा आंतर–प्रतीतीमुळे स्फुरणारा गूढवाद नाही. सूक्ष्मातिसूक्ष्म असा भावगंध कवितेंतून उमटविण्यासाठी कवीची मनोवृत्ति जितकी हळुवार तितकी त्याची कल्पनाशालिता तरल हवी. तरल कल्पनाशालितेचें देणें कवि अत्तरदे यांना खचित लाभलें आहे. अशा कल्पनाचमत्कृतीला जर आमत्परतेचीहि जोड मिळती तर त्यांची कविता गोविंदाग्रजाच्या कवितेसारखी स्वयंकेंद्रित व व्यक्तिनिष्ठ बनून गेली असती; तिच्यांतील आजचा जोरकसपणा व दिलखुलास मोकळेपणा नाहीसा झाला असता. केशवसुतांचा आवेश आणि गोविंदाग्रजांची शब्दकळा या दोहोंचें मधुर मीलन डॉ. अत्तरदे यांच्या कवितेंत झालें आहे, हाच तिचा गौरव व त्यांतच तिच्या मर्यादाहि आहेत. कारण संपूर्ण कवितेंत केशवसुतांच्या प्रेमवृत्तीचा आत्मप्रत्यय किंवा गोविंदाग्रजांची स्वयंकेन्द्रित प्रेमवृत्ति कोठेहि दिसत नाही. तसेंच एखादी कविता सर्वोत्कृष्ट म्हणून नमुनेदार अशी पुढे करितां येत नाही.

अलीकडे कांही टीकाकार जिला ‘विश्लेषणात्मक कविता’ असें विरोधाभासात्मक नांव देतात अशा नवकाव्य–प्रकारांतहि यांतील फारच थोडी कविता मोडेल. तेथेहि डॉ. अत्तरदे लंगडे पडतात, कारण उत्तान शृंगारिक लिहितां आलें तरी त्यांना अश्लील वा बीभत्स लिहिण्याचा चांगला सराव झाला नाही. एखाद्या वेळीं ‘ श्वान मळ्यावर तुटून पडलें ! गिधाड झाडावरती बसलें; गाढव मेलें कोण तयाला रडावयास तयार ? ’ एवढी मजल त्यांची जाते; पण येथेच ते थांबतात; सर्वच संज्ञाप्रवाह व्यक्त करीत नाहीत. कारण त्यांच्याजवळ दडपून टाकलेलें व जें संज्ञाप्रवाहांतून बाहेर पडेल असें फारसें नाहीच. आणि अरेरे, बिचाऱ्यांजवळ मानवतेचा महान् संदेश, विश्वशांतीचा विराट आशय, क्रांतीचा उद्घोष किंवा प्रेमभंगाची तळमळ कांहींच नाही! कवि हा एक साधासुधा माणूस आहे. त्याच्याजवळ माणुसकी आहे, पण ‘ मानवता ’ वा ‘महामानवता’ नाही.त्याची रोजच्या जीवनांतील सुखदुःखें आहेत;त्यांतहि काव्यांत वर्णन करण्यासाठी सुखेंच आहेत; दुःखें एकूण कमीच. काव्यांत प्रेमभंगाची तळमळ दिसत नाही तशी युद्धजन्य भीषण परिस्थिति, आंतरवैश्विक उलथापालथ आणि यंत्रयुगाची यांत्रिकता यांविषयी मळमळ नाही; अर्थात् ‘ वैफल्य ’ नाही. बिचारा सिगरेटसाठी ‘ श्वेतांबरी ’ आणि विडीसाठी ‘ गावठी भिकुसा ’ शब्द वापरतो. पण त्याला कांही नवयुगाचा महान् साक्षात्कार झालेला दिसत नाही. त्यामुळे त्याची कविता ‘ आशावादी’हि म्हणतां येत नाही. नक्की अर्थ लक्ष्यांत घेऊनच तो प्रतिमा वा उपमानें वापरतो त्यामुळे ‘ अत्तरदार्गी ’त ती असीम दुर्बोधता नाही ! तात्पर्य, कोणत्याहि अर्थानें ‘ नवकवि ’ या पदवीस अपात्र असला हा कवि केशवसुताच्या जीर्णपरंपरेंतील–जींत गोविंदाग्रजांनी त्यांच्या काळीं प्रेमाची पहिली वारी केली व माधव ज्यूलियन यांनी ज्या प्रणयपंढरीची वारी केली त्याच परंपरेंतील डॉ. अत्तरदे हेहि एक ‘ वारकरी ’ आहेत. ‘ दिलरुबा दिलाचा साथ लागला द्याया ’ ‘ शिस्त हवी अन् जरा नियंत्रण थांब दिवस कांही’ अशा कांही पंक्ति आणि कलंदर, प्यार,दिलासा, मिलाफ, जहाँगाज, मैफल, मिष्किल असे कांही शब्द विखुरले असले तरी त्यांत त्यांची पृथगात्मकता नाही. इंग्रजी शब्द ते क्वचितच वापरतात हेंहि सांगणें आवश्यक आहे. थोडक्यांत म्हणजे त्यांची भाषा



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

सामान्यतः सुसंस्कृत व संस्कृतप्रचुर आहे. त्यांनी कांही खानदेशी बोलींतील सूचक शब्द वापरले असून त्यांच्यावर पुस्तकाच्या अखेरीस टीपाहि जोडल्या आहेत. ते शब्दहि सहजगत्या आलेले अर्थात् काव्यात्म आहेत. कारण खुद्द कवीच्या भावविश्वाच्या अभिव्यक्तीसाठी ते अपरिहार्यपणें आपापल्या जागीं येऊन बसल्याप्रमाणें वाटतात. अर्थात् कांही शब्द स्वाभाविकपणें ग्रामीण असले तरी एकंदर वातावरण कांही ग्रामीण वा ग्राम्य नाही.

आपल्या काव्यशक्तीविषयी दुर्दम्य आत्मविश्वास आणि प्रेमभावना आकर्षक चमत्कृतीने व्यक्तविण्याचें सामर्थ्य या गुणांच्या प्रकर्षामुळे डॉ. अत्तरदे यांची कविता ओजस्वी व मनाला जाऊन भिडणारी झाली आहे. ही ओजस्विता व हा जोरकसपणा नसता तर कवीला प्रेमविकाराचें इतकें दिलखुलास वर्णन करतांहि आलें नसतें. केवळ प्रेमाभिव्यक्तीमुळेच नव्हे तर तिच्यांतील समाजाभिमुखतेमुळे व नर्मगर्भ खेळकरपणामुळे अत्तरदाणी रसिकांना संग्राह्य वाटेल व कवीच्या आगामी कृतीची ते सोत्कंठ प्रतीक्षा करतील. डॉ. अत्तरदे हे प्रामुख्याने छंदःशास्त्रज्ञ आहेत. कविता रचणें हा त्यांचा छंद आहे. आणि सहृदय वाचकांस आनंदविण्याचें सामर्थ्य त्यांत आहे, एवढें निश्चित.

—माधव गोपाळ देशमुख

**कौंतेय**–[ नाटक. लेखक : वा. वि. शिरवाडकर. मूल्य २ रुपये. ]

' कौंतेय ' हें शिरवाडकरांचें तिसरें नाटक. तें प्रसिद्ध होऊन व रंगभूमीवर येऊन आता २ वर्षें झालीं आहेत. या काळांत या नाटकावर अनेक टीका येऊन गेल्या आहेत. या टीकांतून कर्णाच्या स्वभावचित्रावर फार मोठे आक्षेप घेण्यांत आलेले आहेत. ' कौंतेय ' नाटकाने मातृत्वाच्या पावित्र्यावर घोर आघात केला आहे असें कांहींचें म्हणणें आहे. ' कौंतेय ' नाटकांतील शकुनी, कर्ण म्हणजे स्वतः शिरवाडकर आणि पहिल्या व दुसऱ्या अंकांतील शकुनी व कर्णाच्या तोंडचीं भाषणें म्हणजे या नाटककाराच्या मनांत वसणारा मातृत्वाचा किळसवाणा अनादर होय असें म्हणण्यापर्यंत कांहींची मजल गेली आहे.'आदर्श व्यक्ती'च्या अशा चित्रणांतच नाटककारांना धन्यता वाटत असेल तर मराठी रंगभूमीची रुग्णावस्था कायम राहिली तरी चालेल असेंहि कांहींनी म्हटलें आहे.

कर्णाच्या तोंडीं मातृत्वाच्या निंदेसाठी घातलेलीं वाक्यें किळसवाणीं आहेत याबद्दल वाद नाही. तीं सौजन्याला सोडून आहेत. इतकीं भडक आणि घृणास्पद वाक्यें घातलीं नसतीं तरी चाललें असतें. परंतु त्यामुळे कर्णाची संपूर्ण व्यक्तिरेखाच भ्रष्ट झाली आणि महाभारतांतील एका आदर्श व्यक्तीचें विकृत स्वभावरेखन करण्यांत आलें हें म्हणणें वस्तुस्थितीला कितपत धरून आहे याचा विचार करणें आवश्यक आहे.

'कौंतेय' हें एक नाटक आहे व त्या दृष्टीनेच त्याचा विचार व्हावयास पाहिजे. या नाटकांत निर्माण झालेला संघर्ष दोन पूर्णतः सुष्टदुष्ट व्यक्तींतील किंवा मनोवृत्तींतील नाही; तर परिस्थितिप्राप्त अवस्थेत दोन आदर्श व्यक्तींच्या जीवनांत नियतीने आधीच उत्पन्न केलेल्या बिकट समस्येमुळे तो निर्माण झाला आहे. आणि तो शिरवाडकरांनी उत्तम रंगविला आहे. त्यांत नाट्यहि भरपूर आहे, असें आमचें मत आहे. या नाटकांत पात्रांची संख्या पुष्कळ असतांहि प्रतिपाद्य समस्येला अनुसरून कर्ण आणि कुंती या दोन स्वभावचित्रांनाच यथायोग्य उठाव दिल्यामुळे


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

ह्या स्वभावरेखा सुसंगत, अनुरूप व तर्कशुद्ध वाटतात. महाभारतांतील कथा पार्श्वभूमीसाठी घेतलेली असली तरी आपल्या प्रयोजनानुरूप त्यांत आवश्यक ते रंग भरण्याची सवलत नाटककाराला असतेच. खाडीलकरांची द्रौपदी, मेनका, विश्वामित्र हीं पात्रें किंवा परांजप्यांचा पहिला पांडव या विधानाची साक्ष देतील.

कौंतेय नाटकांतील कर्णाची स्वभावरेखा निसर्गधर्माला अनुसरून, सुसंगत, तर्कशुद्ध व प्रतिपाद्य समस्येला धरूनच शिरवाडकरांनी रेखाटली आहे. त्यामुळे महाभारतांतील कर्णाची स्वभावरेखा मुळीच दूषित झाली नाही. नाटकांतील संघर्ष रंगविण्यासाठी थोडाफार त्यांत भडकपणा आला आहे एवढेंच. कुंती राजमाता असली तरी ती कुमारी माताहि होती. कर्ण पराक्रमी असेल, उदारचरित असेल, परंतु त्याच्या हीन मातृत्वामुळे आयुष्यांत त्याला अनेक दु:खें, अपमान, उपहास, सोसावे लागले. कर्ण आणि कुंती यांच्या समस्येला आजची आमची समाजपरिस्थितिहि अपवादभूत नाही. कर्णाला अशा परिस्थितींत सेनापतित्व मिळालें, त्यामुळे तो अत्यंत हर्षित झाला. अशा वेळीं आपल्या अपरंपार सुखांत आपल्या मातेला जागा नाही, ती असती तर आपला गौरव पाहून तिलाहि आनंद झाला असता या जाणिवेने त्याचें अंतःकरण व्यथित असतां व मातृदर्शनाची उणीव त्याच्या जिव्हारीं लागली असतांच कुंती आकस्मिकरीत्या त्याच्याकडे येते आणि ' कर्णा ! मी तुझी खरी आई आहें ' असें सांगते. क्षणभर तो आनंदाने वेडा होतो, पण लगेच अपमानाच्या व उपहासाच्या अनंत यातना जिच्यामुळे आपल्याला सोसाव्या लागल्या, आपल्या सामाजिक प्रतिष्ठेसाठी जिने एका अजाण अर्भकाचा प्राण वाऱ्यावर लोटून दिला ती कुंती आपली माता आहे हें दारुण सत्य आकस्मिक रीत्या त्याला कळतांच मनुष्यसुलभ विकारांच्या तो आहारीं गेला आणि त्याने कुंतीची निर्भर्त्सना केली. बोलूं नये तें तो बोलला; अगदी किळसवाणें बोलला. परंतु आत्यंतिक दु:खाच्या क्षोभाच्या प्रसंगीं महान् व्यक्तींचाहि तोल सुटतो, संयम नाहीसा होतो हें कोणाला अमान्य करतां येईल काय ? विचारापेक्षा विकाराच्याच आहारीं अशा वेळीं मनुष्य जातो. प्रखर दारुण सत्याच्या आकस्मिक दर्शनाने विव्हळ झालेला कर्ण कुंतीला वाटेल तसें टाकून बोलला हा मनुष्याच्या नैसर्गिक आणि सत्य प्रवृत्तीचाच आविष्कार म्हणतां येणार नाही काय ?

भावावेग ओसरतांच तोच कर्ण म्हणतो, ' आई ! आई ! केवढा पापी गुन्हेगार आहें मी ? पांडवांच्या आईनेच कर्णाला जन्म दिला हें कर्णाचं दुर्दैव. त्याचें शासन कुंतीला कशाकरितां ? कुंतीने तुझा त्याग केला. पण ती दुसरें काय करूं शकत होती ? नगरवेशींत उभं राहून तिनं सांगायला हवं होतं का की हा माझा कुवारपणांतील मुलगा आहे म्हणून ? समाजानं बांधलेले आंधळ्या निष्ठांचे तट एका व्यक्तीला फोडतां येत नाहीत. जें शौर्य कुणालाहि दाखवितां आलं नसतं तें कुंतीनं दाखविलं नाही म्हणून तिचा तिरस्कार करायचा ?' याची जाणीव त्याला होतांच त्याचें निरपेक्ष मातृप्रेम जागृत होतें व पश्चात्तापदग्ध कर्ण क्षमायाचनेसाठी पांडवांच्या शिबिरांत जातो आणि आपल्या मातेच्या पायावर मस्तक ठेवून 'आई! माझ्या विश्वांतील सारी पुण्याई या दोन पावलांमध्ये आहे ' असें कुंतीला सांगतो. ' कौंतेय' नाटकांतील कर्णाचें चित्र हें असें आहे. कर्णाऐवजी इतर कोणतीहि व्यक्ति कर्णाप्रमाणे बोलली असती तर सामान्य माणसाच्या मनोधर्माप्रमाणे त्यांत असंभाव्य, अनैसर्गिक असें कांही वाटलें असतें का ? वाटलें नसतें हें जर खरें असेल तर तंत्रदृष्ट्या कर्णाच्या स्वभावपरिपोषांत कांहीच दोष मानतां येणार नाही.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

महाभारत साक्षीला ठेवून पडताळून पाहिलें तरी ' कौंतेयां 'तील कर्ण–चरित्र सत्याच्या पायावरच उभें असलेलें दिसून येईल. महाभारतांतील कर्ण ' कौंतेय ' नाटकांतील कर्णासारखाच आहे. तो महात्मा तर खासच नाही. महाभारतांतील कर्णहि भरसभेंत रजस्वला अवस्थेंत असलेल्या द्रौपदीला विवस्त्र करूं पाहणाऱ्या कौरवांचा साथीदार आहे. महाभारतांतील सभापर्वावरून ( अ. ६८ ) कर्णाच्या खऱ्या स्वभावाची कल्पना येते. रजस्वला, एकवस्त्रा द्रौपदीला दुःशासनाने तिची वेणी धरून भरसभेंत ओढून आणली असतां कर्ण दुःशासनाला म्हणतो, ' ह्या बन्धकी द्रौपदीचें वस्त्र तूं सर्वांसमक्ष हिरावून घे व तिला भरसभेंत नग्न करून तिची उघडी काया सर्वांना डोळे भरून पाहूं दे. ' हा महाभारतांतील कर्ण कौंतेयांतील कर्णाप्रमाणे वागला नसता असें खास म्हणतां येत नाही. कर्णाचें हें महाभारतांतील चित्र विचारांत घेतां ' कौंतेय ' नाटकांत शिरवाडकरांनी कर्णाचा स्वभावपरिपोष यथायोग्य केला असेंच म्हणावें लागतें.

शिरवाडकरांच्या या नाटकांत खऱ्या व उत्तम नाट्यवाङ्मयाच्या विकासाला आवश्यक असणारी इष्ट मनोवृत्ति व स्वतंत्र प्रज्ञा या गोष्टी ( ज्या आज अभावानेच आढळतात ) पाहावयास मिळतात हें विशेष होय. शिरवाडकरांनी आपलें पहिलेंच नाटक खाडीलकर व गडकरी यांच्या नाट्यप्रतिभेस अर्पण केलें आहे. आणि या दोन थोर नाटककारांच्या नाट्यप्रतिभेचा वारसा आजच्या काळांतहि त्यांनी उत्तम प्रकारें चालविला आहे. पौराणिक कथांच्या पार्श्वभूमीवर विद्यमान राजकीय वा सामाजिक समस्या खाडीलकरांनी आपल्या नाटकांत रंगविल्या आहेत. तीच गोष्ट शिरवाडकरांनी या नाटकांत साधली असून गडकऱ्यांची नाट्यपूर्ण भावनोत्कटताहि त्यांच्याजवळ भरपूर आहे. नाट्याचार्य खाडीलकरांची प्रतिभा आणि नाट्यनिर्मितीचें सामर्थ्य शिरवाडकरांत आज आहे किंवा नाही हा वादाचा प्रश्न ठरूं शकेल. खाडीलकरांच्या बरोबरीचा मान मिळविण्यासाठी त्यांना फार मोठी तपस्या करावी लागेल हेंहि उघड आहे. कारण कलावन्ताची कलाकृति त्याच्या प्रखर व्यक्तिमत्वाच्या आधारावरच अधिक सामर्थ्यवान बनूं शकते. जीवनाची व्यापक अनुभूति, उच्च भावांचे संस्कार आणि सर्वव्यापी जीवनाचें सखोल ज्ञान या गोष्टी व्यक्तिसापेक्षच असतात आणि त्या व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव नाटकाला प्राणवत् असणाऱ्या संवाद, समस्या आणि संघर्ष या गोष्टींवर प्रत्येक कणाकणांत पडलेला असतो. उच्च भावाविष्कारानें जीवनाचा साक्षात्कार प्रभावाने घडविते, चिरकालिक परिणामकारकता साधते आणि आत्मानुभूतीचा आनंद देते ती कला अशा लोकोत्तर व्यक्तिमत्त्वाच्या आधारावरच प्रगट होऊं शकते. परंतु आजहि शिरवाडकरांच्या मनाची ओढ उच्च भावाविष्कारित हृदयाचा वेध घेणाऱ्या नाट्याकडे आहे हें त्यांच्या आजवरच्या तीनहि नाटकांनी सिद्ध केलें आहे. नवीनाचें अंधानुकरण करण्याचा सोस त्यांना नाही. आधुनिक तंत्राच्या खटपटींत पडण्याकडे त्यांचा भर नाही. तर खऱ्या नाटककाराप्रमाणे जीवनांत विपुलतेने वसणारें नाट्य नेमकें शोधून काढून तें रंगविण्यांतच त्यांनी आतापर्यंत आपली प्रतिभा खर्च केली हा त्यांच्या नाटकांचा फारच मोठा विशेष आहे.

याचा अर्थ ' कौंतेय ' नाटकांत कांहींच दोष नाहीत असा नाही. त्यांच्या संवादावर गडकऱ्यांच्या भाषेची स्पष्ट छाया दिसते. या नाटकांतील संवादांना संवाद म्हणण्यापेक्षा भाषणें म्हणावें लागेल. पहिल्या अंकांतील संवाद कृत्रिम तर आहेतच शिवाय ते दुर्बोधहि आहेत. शिरवाडकरामधील कवि या भाषणांमधून व्यक्त होत असला तरी ती काव्यात्मकता नाट्याला पोषक झालेली नाही. दुसऱ्या व तिसऱ्या अंकांत भीषण नाट्य रंगत असतां आलेले

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

संवाद रसवाही व भावपूर्ण असले तरी आहेत यापेक्षा ते अधिक स्वाभाविक असते तर बरें झालें असतें. ते संवाद गडकऱ्यांच्या 'प्रेमसंन्यास' मधील संवादाप्रमाणे झाले आहेत त्यापेक्षा 'एकच प्याला' मधील संवादांप्रमाणे प्रसादपूर्ण व रसवाही असते तर बरें झालें असतें. 'कौंतेय' नाटकाचा पहिला अंक एखाद्या कादंबरींतील कथानकाप्रमाणे निवेदनात्मक वाटतो. त्यांत सूचकता नाही. त्याने ४५ पृष्ठें व्यापलीं असूनहि संघर्षाची मांडणी स्पष्ट व रेखीव नसल्यामुळे तो पाल्हाळिक वाटतो. या नाटकाचा स्वाभाविक धर्म गंभीर आहे. त्यांत विनोद नसता तरी कांही बिघडलें नसतें. कर्णाचा इनामी सेवक जांबील याच्या द्वारा आलेला विनोद कथानकाशीं विसंगत तर आहेच परंतु स्त्रियांच्याबाबत कविकल्पनेला आवडलेल्या चारदोन असदभिरुचिकारक कल्पना व्यक्त करण्यापलीकडे त्याची मजल गेली नाही. एकंदर कथानकांतील वातावरण टीकाविषयीभूत भाषणांच्या बाबतींत संयम न राखल्यामुळे आधुनिक समाजजीवनाशींच अधिक सदृश वाटतें.

परंतु हे दोष जमेस धरूनहि आम्ही या नाट्यलेखनाबद्दल शिरवाडकरांचें अभिनंदन करतों. कारण नवनाट्याच्या अवास्तव हव्यासापायी कारागिरीलाच कला समजण्याची जी अनिष्ट प्रवृत्ति आज बळावत असलेली दिसते तिला या नाटकांत हेतुपुरःस्पर त्यांनीं प्रतिरोध केला आहे. खरें प्रभावी नाट्य कशांत आहे याची जाणीव ठेवून उच्च भावाविष्काराचें, जीवन-साक्षात्काराचें ध्येय नजरेसमोर निश्चितपणें ठेवून त्यांनी आपलें नाटक लिहिलें आहे. आणि त्यांत त्यांनी स्पृहणीय यशहि मिळविलें आहे. रंगभूमीच्या उपासकांना शिरवाडकरांची ही मनोवृत्ति आणि नाट्यरचनाचातुरी सदैव आनंदित करील असा विश्वास वाटतो.

—द. रा. गोमकाळे.

अंजनी —[ कादंबरी. लेखकः—के. नारखेडे, भुसावळ. प्रकाशकः ग. ल. ठोकळ, लेखन-वाचन भांडार, पुणें. किंमत ५ रुपये. ]

कवि, कथाकार आणि काव्यविवेचक म्हणून साक्षेपी वाचकांना परिचित असलेले श्री. के. नारखेडे यांनी ही कादंबरी लिहिली आहे. ग्रामीण जीवनावर आधारलेली ही कथा अत्यंत सुंदर आहे. खानदेशांतील लेवा समाजाचें अंतरंग ओळखण्याच्या दृष्टीने तो फार महत्त्वाची वाटते. शेतकऱ्यांच्या जीवनांतील अनेक प्रसंग नारखेडे यांनी मोठ्या रसिकपणाने यांत वर्णिलेले आहेत. गणूभाऊसारखा गांधीवादी ग्रामसेवक, मंगा महाजनासारखा कावेबाज सावकार आणि जाना पाटलासारखा अहंकारी पोलिस पाटील यांच्या स्वभाववैशिष्ट्यांतून व क्रिया-प्रतिक्रियांतून कथेचा विकास होतो. गणूभाऊच्या सान्निध्यांत विकसित झालेलें अंजनीचें जीवन हा एका दृष्टीने या कादंबरीचा केंद्र-बिंदु आहे. अंजनीचा विवाह माधवशीं झालेला होता. पण वकील होतांच पांढरपेशा बनलेल्या माधवने आपल्या अडाणी व अशिक्षित अंजनीस सोडचिठ्ठी देऊन मंगा महाजनांच्या सुशिक्षित मैनेशीं लग्न लावलें. त्यामुळे समाजसेवेंत आपलें जीवन घालविणाऱ्या अंजनीचें व्यक्तित्व अत्यंत आदरणीय वाटतें. मैनेचें म्हणजे प्रत्यक्ष आपल्या सवतीचें बाळंतपण करण्याचा प्रसंग जेव्हा तिच्यावर आला तेव्हा तिने असामान्य मनोधैर्य दाखवून मैनेची सुटका सुखरूपपणें केली. त्यामुळे मैनेशीं तिचा चांगला स्नेह जुळला. मैनेला अंजनीच्या थोर अंतःकरणाची परीक्षा झाली. आपल्यामुळे अंजनीचें वैवाहिक जीवन नष्ट झालें



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

हें तिच्या लक्षांत येतांच तिला अत्यंत खंत वाटूं लागली. तिने अंजनीला तिच्या जीवनांत पुन्हा प्रतिष्ठित करण्याचा प्रयत्न केला. पण'न घडे त्याचें नाव कशाला?' असें म्हणून अंजनीने त्याला नकार दिला. हें पाहतांच या दोन्ही स्त्रियांची सात्त्विकतेंत जणु स्पर्धा चाललेली आहे असें वाटतें; इतकीं हीं व्यक्तिचित्रें नितांत सुंदर आहेत. किंबहुना या कादंबरींत वर्णन केलेलें सर्व स्त्री–जीवनच अत्यंत उच्च आणि आदरणीय असें आहे. अंजनीच्या अंतःकरणाची ओढ गणुभाऊकडे आहे हें कळतांच त्या दोघांचा विवाह घडवून आणण्याचा आदेश मृत्युशय्येवरून देणारी सारजा, सर्वांना प्रेमळपणाने वागवून त्यांवर मायापाखर घालणारी जानका माय, आणि राजारामाच्या जीवनांत पूर्णपणें सामावून गेलेली सई हीं स्वभावचित्रेंहि या वातावरणाला शोभून दिसतील अशींच आहेत. विशेष हें की स्त्रिया ह्या सात्त्विकतेच्या पुतळ्या असल्या तरी दुबळ्या मात्र नाहीत. पाटलांच्याकडून बोलावणें येतांच चावडीवर जाण्याइतकी भोळी असलेली सई फौजदाराच्या तपासणीचा रोख लक्ष्यांत येतांच आपल्या पतीचा मागमूस लागूं देत नाही. आणि त्यासाठी उन्हांत उभें राहण्याची शिक्षा धैर्याने सोसते. तशीच अंजनीहि. नवऱ्याने सोडचिठ्ठी दिल्यावर इतर सामान्य स्त्रियांप्रमाणे मुळूमुळू रडून शेवटीं दुसऱ्या कुणाबरोबर तरी गंधर्व लावण्यापेक्षा सर्व जीवन विवाहनिरपेक्षतेने घालविण्याचा तिचा कठोर निश्चय जसा तिच्या खंबीर अंतःकरणाचा दिग्दर्शक आहे तसाच गणुभाऊ जंगल सत्याग्रह करून कैदेंत गेल्यानंतर त्याच्या मागे त्याचें कार्य पुढे चालू ठेवण्याच्या दृढनिश्चयाने तिने सत्याग्रहांत घेतलेली उडी आणि त्यासाठी सहन केलेले कष्ट हेहि तिच्या समर्थ मनाचे सूचक आहेत. पण याहिपेक्षा तिच्या सामर्थ्याची जाणीव करून देणारा एक विलक्षण प्रसंग श्री. नारखेड्यांनी रंगविला आहे. जाना पाटलाच्या चिथावणीवरून चौकशीला आलेला समशेर जमादार धुंद नजरेने पाहात जेव्हा अंजनीजवळ येऊन उभा राहिला तेव्हा तिने त्याच्या गालांत काडकन् चपराक लगावली, इतक्या जोराने की समशेरचे गाल काळेनिळे होऊन त्याच्या डोळ्यांपुढे काजवे चमकूं लागले!आणि या प्रसंगाला कारणीभूत झालेल्या जाना पाटलाच्या पिक-लेल्या केसांची तिने केलेली विटंबना! यांत अंजनीचें सामर्थ्य दिसून येतें. श्री. नारखेडे यांनी ही अपूर्व स्त्रीसृष्टि निर्माण केली यांत शंका नाही. त्यांतील मैना व अंजनी क्वचित् आढळणाऱ्या व्यक्ति आहेत हें खरें असलें तरी त्यांच्या प्रतिकृति लेवा समाजांत अगदींच आढळत नाहीत असें नाही. या स्त्रीसृष्टीप्रमाणेच श्री. नारखेडे यांच्या पुरुषसृष्टींतहि विविधता आणि वैचित्र्य विपुल प्रमाणांत भरलेलें आहे. तथापि मंगा महाजनांचा झालेला हृदयपालट जितका वास्तव वाटतो तितकाच जाना पाटलाचा हट्टीपणा अवास्तव वाटतो. पण त्यावरूनच ' जे का व्यर्थ परार्थ हानि करिती ते कोण की दुर्मती 'या कविवचनाची सत्यता प्रत्ययाला येते, ही गोष्ट खरी आहे.

अंजनींत असे अनेक गुण भरलेले आहेत हें खरें असलें तरी ती अव्यंग आहे असें मात्र नाही. ही कादंबरी वाचून झाल्यावर माझ्यासमोर आकृति उभी राहिली ती प्रत्येक अवयव सुंदर असूनहि प्रमाणबद्धतेच्या अभावीं असुंदर दिसणाऱ्या रमणीची. अंजनीचें तसेंच आहे. यांतील कथारचनेंत एकप्रकारचा विस्कळितपणा आहे. कादंबरीला लेखकाने दिलेलें नांव लक्ष्यांत घेतलें तर ही कादंबरी म्हणजे एका परित्यक्तेची कहाणी असावीसें वाटतें. आणि लेखकाने प्रत्यक्ष वर्णन केलेल्या प्रसंगांच्या अनुषंगाने विचार केला तर गणुभाऊच्या आयुष्यांतील एका विशिष्ट कालखंडाचें तें चित्रण आहे असा भास होतो. त्यामुळे ही कादंबरी एकसंध वाटत नाही.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कादंबरी ही विविध प्रसंगांनी आणि पात्रांनी भरलेली असली तरी तिचा पिंड एकरसात्मक असावा लागतो याची लेखकाने फारशी जाणीव ठेवलेली नाही. दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी की, खानदेशांतील लेवा समाजाच्या जीवनावर आधारलेल्या या कथेंत त्या समाजांतील भोरगाव पंचायतीचें, व 'सत्पंथ' या नांवाने प्रसिद्ध असलेल्या संप्रदायाचें सविस्तर वर्णन आलेलें आहे. पण त्यांचा कथानकाशीं फारसा जिव्हाळ्याचा संबंध नाही, याची जाणीव झाल्यावांचून राहात नाही. लेवा समाजांत 'अंजनी' सारख्या परित्यक्तांचा प्रश्न फार मोठ्या प्रमाणांत विद्यमान आहे हें खरें; पण अंजनी-माधव-मैना यांच्या कथानकांत त्याचें अत्यंत एकांगी आणि अवास्तव असें दर्शन होतें. माधवने अंजनीला सोडचिठ्ठी दिली ती अंजनी त्याला शोभणारी वाटत नव्हती म्हणून दिली, की मैनेच्या सौंदर्याने मोहून जाऊन दिली, की मंगा महाजन आणि जाना पाटील यांच्याकडून होणाऱ्या व्यावसायिक साह्याच्या अपेक्षेने दिली? याविषयी लेखकाची कल्पना निश्चित नसावी असें मानण्याला जागा आहे. या कादंबरींतील आणखी एक महत्त्वाची उणीव फार जाणवते. आणि ती आहे भाषेची. 'अंजनी'ची भाषा नागर आहे. लेवा पाटीदार समाजाची बोलभाषा तींत नाही. संवादांतहि ती भाषा नाही असें खुद्द लेखकानेच म्हटलें आहे. त्याने केलेल्या विनंतीप्रमाणे 'आमचीं जानपद गीतें' हा त्यांचा लेख वाचूनहि असें म्हणावेंसें वाटतें की यथार्थ व्यक्तिचित्रणाच्या दृष्टीने कादंबरीतील पात्रांच्या तोंडीं बोलभाषा वापरणेंच अधिक इष्ट झालें असतें. त्याच्या अभावीं भाषेच्या नागरपणावरून कादंबरींतील व्यक्तीहि नागरच आहेत अशी वाचकांची कल्पना होते; व त्यामुळे या जानपद कथेंतील अर्धे अधिक सौंदर्य उडून जातें.

जानपद गीतें काय किंवा कथा काय पांढरपेशा वर्गातील लोकांना घटकाभर मौज वाटते म्हणून लिहिलीं जातात; जानपद जीवन ज्यांच्या समोर मांडायचें त्यांच्याच भाषेत तें लिहिलें पाहिजे, ही श्री. नारखेडे यांची भूमिकाच चुकीची आहे. या प्रश्नाचा विस्ताराने विचार करण्याचा हा प्रसंग नाही. पण कादंबरी-लेखनाच्या बाबतींत मात्र निश्चितपणाने असें म्हणतां येईल की जीं चित्रें रेखाटायचीं असतील तीं यथार्थ व्हावीं म्हणून त्यांच्या तोंडीं भाषाहि त्यांचीच वापरली पाहिजे. बोली भाषा नागरिकांना कळणार नाही ही भीतिहि व्यर्थ असल्याचें आतापर्यंत अनेकांनी निदर्शनाला आणून दिलें आहे. त्याचें विशेष प्रत्यंतर 'बहिणाईच्या गाण्यांत' आपणांस मिळतें. श्री. नारखेड्यांची अंजनी, मैना, सारजा ज्या लेवा समाजांतील आहेत त्याच समाजांतील बहिणाई ह्या आहेत. त्यांच्या अंतःकरणाचे उद्गार आपल्या खास खानदेशी भाषेत व्यक्त झाले आहेत; आणि त्यांचा आस्वाद घेतांना भाषेची अडचण कोणत्याहि मराठी रसिकाला वाटली नाही, हें श्री. नारखेडे यांच्या निदर्शनाला आणून देणें अवश्य वाटतें. त्यांनी 'अंजनी'तील संवादांत या बोलीचा उपयोग केला असता तर कादंबरीच्या वास्तवतेंत व सौंदर्यात अधिक भर पडली असती.

प्रस्तुत कादंबरीच्या वाचनाने श्री. नारखेडे यांच्या कथालेखनकौशल्याची चांगली ओळख पटते. पहिल्याच प्रयत्नांत त्यांनी मिळविलेल्या यशाबद्दल त्यांचें मी मनःपूर्वक अभिनंदन करतों; आणि या कादंबरीने त्यांच्याविषयी निर्माण झालेल्या अपेक्षा नवीन कादंबरीलेखनानें त्यांनी पूर्ण कराव्या असें प्रेमभावाने त्यांना सुचवितों.

वि. भि. कोलते



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

**महात्मा आणि सत्यशोधक चळवळ**:—[ लेखक : मा. प. मंगुडकर. प्रकाशक स. मा. गर्गे, सोशल बुक स्टॉल, पुणें ४. किंमत १२ आणे. ]

महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक व धार्मिक क्षेत्रांत क्रान्ति घडवून आणण्याचे भगीरथ प्रयत्न गेल्या ७५ वर्षांत ज्या नेत्यांनी केले, त्यांच्या कार्याचें मूल्यमापन अनेकविध दृष्टिकोनांतून सांप्रत होत आहे. महात्मा फुले यांचें कार्य किती मोलाचें आहे याचें विवेचन प्रा. सरदार, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी इत्यादि विद्वानांनी आपापल्या परी केलेलें आहे. श्री. मंगुडकर यांचें प्रस्तुत पुस्तक याच प्रकारांत समाविष्ट होतें. अत्यंत समाधानाची गोष्ट अशी की श्री. मंगुडकर यांनीं आपलें विवेचन जसें साधार केलें आहे, तसेंच त्यांच्या विवेचनांत विशिष्ट अभिनिवेशहि दिसून येत नाही. विशेषतः सत्यशोधक चळवळीचा त्यांनी दिलेला इतिहास सुसूत्र असून त्या इतिहासाचा अर्थ लावण्याचा त्यांचा प्रयत्न पुष्कळच अंशीं सफल झाला आहे. ' सत्यशोधक चळवळ सत्ताशोधक चळवळ बनली ' ( पृ. ३१ ) या शीर्षकाखाली त्यांनी केलेलें विवेचन तर्कशुद्ध व मोठें मार्मिक आहे. महात्मा फुले यांचा आशय हा व्यापक भूतदयावादाचा वा विश्वबन्धुत्वाचा होता. परंतु त्यांच्या विचाराची अभिव्यक्ति मात्र अत्यंत ओबड धोबड असा निर्णय लेखकानें केला आहे. हा निर्णय बऱ्याच अंशीं योग्य आहे. ते म्हणतात " मानवी ऐक्य हें एकच सत्य आहे " हा त्यांच्या विचारांचा गाभा आहे. याच एका 'सत्या'च्या शोधासाठी आयुष्यभर ते भटकत होते. त्याचा शोध त्यांना त्यांच्या जीवनांत लागला. म्हणूनच त्यांना सत्यशोधक ज्योतिराव म्हणावयाचें. या मानवी ऐक्याच्या आड जातिभेद, धर्मभेद, राष्ट्रभेद, खंडभेद, लिंगभेद येतात म्हणून त्यांनी या सर्व भेदांवर प्रखर टीका केली आहे.

महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासाचा अभ्यास करणारांना प्रस्तुत पुस्तक उपयुक्त ठरेल यांत शंका नाही.

( १ ) **Gramatica Marastta**:—( लेखक :— प्रा. अ. का. प्रियोळकर, किंमत २ रुपये ).

( २ ) **महाराष्ट्र भाषेचें व्याकरण**:—संपादक प्रा. अ. का. प्रियोळकर, डायरेक्टर मराठी संशोधन मंडळ, मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय, मुंबई २ किंमत रु. ४. )

मुंबईच्या मराठी संशोधन मंडळाचे प्रमुख प्रा. अ. का. प्रियोळकर यांनीं व्याकरण विषयक हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध करून मराठीच्या व्याकरणविषयक संशोधनांत मोलाची भर घातली आहे.

Gramatica Marastta हें कोंकणी भाषेचें व्याकरण असून ही कोंकणी मुंबई, ठाणें, सालशेट इत्यादि गांवांच्या परिसरांत बोलली जाणारी मराठीची एक पोटभाषा होती. याच विभागांत मिशनरी लोकांच्या कार्याचा व्याप होता. म्हणून लोकांची भाषा शिकणें त्यांना आवश्यक झालें व यांतून या व्याकरणाचा जन्म झाला. हें व्याकरण १७७८ च्या पूर्वीच बहुधा तयार झालें असावें. व १८०५ सालीं तें लिस्बन येथें छापलें असा प्रा. प्रियोळकरांनी निर्णय केला आहे. हा मिशनरी लोकांचा प्रयत्न होता, साहजिकच व्याकरणाची रचना त्यांनी लॅटिन भाषेच्या व्याकरणाला धरून केली आहे. प्रा. प्रियोळकरांच्या दीर्घ व्यासंगामुळे मराठी भाषकांना एका उपयुक्त पुस्तकाचा लाभ झाला. व्याकरणाचा अभ्यास करूं इच्छिणारांनी हें पुस्तक अवश्य अभ्यासावें इतकी याची महती आहे.

प्रा. प्रियोळकरांनी प्रसिद्ध केलेला दुसरा महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे ' महाराष्ट्र भाषेचें व्याकरण ' हा होय. जगन्नाथशास्त्री क्रमवंत, गंगाधरशास्त्री फडके, बाळशास्त्री घगवे यांनी हें व्याकरण रचिलें आहे. या पुस्तकाला प्रा. प्रियोळकर यांनी लिहिलेली प्रस्तावना अत्यंत मह-

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

त्वाची असून त्यांत लेखकाची काटेकोर संशोधनदृष्टि व तळमळीची संशोधन-वृत्ति वाचकांच्या दृष्टीस पडते.

वरील दोन्ही पुस्तकांतील मूळ संहितांचें परीक्षण करणें आतां लाभकारक होणार नाही. कारण प्रस्तुत पुस्तकें एका विशिष्ट परिस्थितींत लिहिलीं गेलीं. त्या पुस्तकाला जोडलेल्या प्रा. प्रियोळकर यांच्या प्रस्तावना अभ्यासकांना संशोधनदृष्ट्या महत्त्वाच्या ठरतील.

' मराठी भाषेंतील पहिलें मुद्रित व्याकरण फडके यांचें होय ' हें विधान अगदीं बरोबर आहे. ' हा छापण्याचा संस्कार प्रथमच आहे ' असें 'महाराष्ट्र भाषेचें व्याकरण' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंतच लिहिलें आहे. प्रस्तावनाकार आणखी लिहितात : पुढें आम्हा तीन पंडितांस प्रथमतः मराठी भाषेचें व्याकरण करण्याविषयीं आज्ञा झाली. तेव्हां आम्हा सर्वांस विचार पडला की महाराष्ट्र भाषेचें व्याकरण कसें करावें. तेव्हां विचार करितां असें मनांत आलें कीं ही भाषा संस्कृताश्रित होय. तेव्हां संस्कृतांत जसा प्रकृतिप्रत्ययभावविचार असाच या भाषेंतहि आहे. मग संस्कृत व्याकरणाध्ययनबळें करून महाराष्ट्र व्याकरणास आरंभ केला" (म भा.व्या.पृ.८) नंतर हें हस्तलिखित छापण्याची बुद्धि झाली व त्यासाठी मूळच्या व्याकरणांतील त्याज्यांशग्राह्यांशविवेक करून लेखक म्हणतात, " मग मी ह्या सर्व विषयांचें आकलन करून हा नवीन ग्रंथ फार संक्षिप्त केला. यांत कुशाग्रबुद्धि असे जे बाळशास्त्री जांभेकर यांसही जा एतदुपयोगी युक्ति सुचल्या त्यांचा संग्रह करून व मी जो लेख सिद्ध केला तो त्यांस दाखवून हा ग्रंथ छापिला." (श्री. ग. गं. जांभेकरकृत बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर पृ. १०५ खंड १ )

या पुस्तकाची जन्मकथा ही अशी आहे. इतरहि अनेक महत्त्वाच्या व्याकरणविषयक गोष्टी या प्रस्तावनांवरून वाचकांस समजतील. डॉ. सुनीतिकुमार चतर्जी आपल्या पुरस्कारांत म्हणतात, " The authors of this work took considerable pains in setting forth the rules which were fortified by examples all through and the book will remain, in the first printed edition as offered by Prof. Priolkar, " a possession forever " in Marathi studies." प्रा. प्रियोळकर यांनी संशोधनक्षेत्रांत केवढी मोलाची कामगिरी केली आहे याचा प्रत्यय म्हणून या दोन पुस्तकांचा परिचय ' पत्रिके 'च्या वाचकांना करून दिला आहे.

**कन्नड-प्रबोध**–[ ले. शं. वि. जोशी, धारवाड, प्रकाशक, दि स्टूडंटस् ओन बुक डेपो, धारवाड, किंमत ३८= रुपये.

कन्नड-प्रबोधसारख्या पुस्तकांची आवश्यकता सांप्रत फार मोठी आहे. एकतर आपल्या शेजारच्या प्रांतांतील भाषेची ओळख असणें देशहितदृष्ट्या महत्त्वाचें आहे व दुसरें म्हणजे भाषाध्ययनाला या प्रकारच्या पुस्तकांचें मोठें साहाय्य होतें. गुजराती, हिंदी इत्यादि भाषा एककुटुम्बीय असल्यामुळे त्यांचा परिचय करून घेणें दुर्घट वाटत नाही परंतु कन्नड भाषेसारखी अन्यकुटुम्बीय भाषा अभ्यासावयास बरेच कष्ट पडतात. श्री. जोशी यांचे अभिनंदन केलें पाहिजे अशाकरतां की त्यांनी आपल्या पुस्तकांत योजलेली अध्यापन-पद्धति नुसती शास्त्रीय आहे एवढेंच नव्हे तर त्यांचें विवेचनहि बरेंच सुगम झालें आहे. बोलण्यांतली कानडी व लेखनांतली कानडी यामधील फरक लेखकाने स्पष्ट केल्यामुळे अभ्यासकांची मोठी सोय झाली आहे. श्री. जोशी यांनी हा उपयुक्त ग्रंथ लिहिला व आंतर भारतीने या ग्रंथाचा पुरस्कार केला याबद्दल आम्ही या दोघांचें अभिनंदन करतों. **' काश्यप '**



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## प्रा. फडके यांचा साहित्याचा वेदांत

मध्यभारत साहित्य संमेलनाचें सातवें अधिवेशन जानेवारी १९५५ च्या दुसऱ्या आठवड्यांत देवास ( थोरली पाती ) येथे मोठ्या उत्साहाने पार पडलें. महाराष्ट्राचे लोकप्रिय कादंबरीकार प्रा. ना. सी. फडके यांनी अध्यक्षस्थान मंडित केलें होतें. ' साहित्याचा प्रसार व साहित्याची गुणवत्ता या दोन गोष्टींच्या मापाने कोणत्याहि साहित्याची प्रगति मोजावयाची असते आणि म्हणून आपल्या अध्यक्षीय भाषणाच्या पूर्वार्धात प्रा. फडके यांनी साहित्याच्या व्यवहारासंबंधीं चार गोष्टी सांगितल्या आणि उत्तरार्धात 'साहित्याचा वेदांत' प्रतिपादन केला. 'उत्तम साहित्य कशाला म्हणावं, साहित्याचा मोठेपणा स्वतंत्र आणि निरपेक्ष कसा आहे यांविषयी जे अविवाद्य मूलभूत सिद्धांत आहेत ' त्या सिद्धांतांनाच त्यांनी साहित्याचा वेदांत असें नांव दिलें आहे. प्रा. फडके यांनी यापूर्वी अनेकदा प्रतिपादिलेलेच सिद्धांत यावेळींहि पुढे मांडले. ' अनुभवाचा आविष्कार व हर्षखेदाची निर्मिति हीच साहित्याची मूळ प्रतिज्ञा म्हणायला हवी ', ' जगांत घडणाऱ्या लहानमोठ्या घटनांचा ललित लेखकाच्या मनावर होणारा ' संस्कार ' आणि त्या संस्काराचा त्याच्याकडून होणारा परिणामकारक आविष्कार—या साहित्यनिर्मितीच्या प्रक्रियेंतील दोन मुख्य घटना आहेत. लेखकाच्या मनावर ज्या अनुभवाचा संस्कार घडला तो वाचकाला जसाचा तसा आणून देण्याचें सामर्थ्य त्या संस्काराच्या आविष्कारांत आहे की नाहीं ही साहित्याची खरी आणि एकच कसोटी म्हटली पाहिजे. हिच्याखेरीज इतर सर्व कसोट्या आगंतुक आणि गैरलागू समजल्या पाहिजेत. '' त्याच्या अनुभवांत उत्कटता किती आहे व नंतरच्या आविष्कारांत रसनिष्पत्तीचं सामर्थ्य किती आहे, यावरच—आणि फक्त यावरच !—त्याच्या कलाकृतीची श्रेष्ठता अवलंबून राहील. ''

या आपल्या सिद्धांताच्या स्पष्टीकरणार्थ प्रा. फडके यांनी चाकू आणि वस्तरा यांचीं उदाहरणें दिलीं आहेत. चांगले—वाईटपणा हा ' ज्या कामासाठी एखादी वस्तु तयार केलेली असते तें काम जितक्या परिणामकारकतेनं ती वस्तु करील तितक्या प्रमाणांत ती आपण चांगली ठरवितों. चाकूचं उद्दिष्ट कार्य कापणं. तेव्हा कापण्याची क्रिया ज्यानं उत्तम घडते तो चांगला चाकू ! ज्याची मूठ सोन्याची आहे तो केवळ त्या मुठीमुळे चांगला चाकू ठरूं शकत नाही. वस्तरा कशासाठी बनवितात, तर केस काढण्यासाठी. ही क्रिया ज्यानं उत्तम होते तो ' चांगला ' वस्तरा...हा साधा न्याय लावून पाहिल्यास साहित्यिकाची श्रेष्ठता व त्याच्या कलाकृतीची योग्यता ठरविण्याची शास्त्रशुद्ध कसोटी कोणती तें पहा. जो अमुक एका विशिष्ट राजकीय मतांचा विचार आपल्या राजकीय कादंबऱ्यांत करतो तो श्रेष्ठ कादंबरीकार ठरणार नाहीं. ज्याच्या कादंबऱ्यांत समाजसुधारणेचें प्रतिपादन आहे तो केवळ तेवढ्या गुणानं मोठा ठरणार नाहीं. ज्याच्या कथा—कादंबऱ्यांत रूढ सदाचाराचीं कीर्तनं आहेत तो केवळ तेवढ्या गुणानं श्रेष्ठ साहित्यिक ठरणार नाही. ललित साहित्याची योग्यता एकाच गुणावरून ठरवावयाची असते. संस्कार आणि आविष्कार यांतील उत्कटता ! ''

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रा. फडके आणि श्री. बाबासाहेब खापर्डे

प्रा. फडके यांना आपला हा वेदांत ' अविवाद्य ' वाटत असला तरी श्री. बाबासाहेब खापर्डे यांना तो तसा वाटत नाही. ता. १९ फेब्रुवारी १९५५ रोजीं नागपूर येथे भरलेल्या विदर्भ साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून भाषण करतांना श्री. खापर्डे यांनी प्रा. फडके यांना उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे. ते म्हणतात " कोणताहि ' अनुभव-जन्य ' संस्कार उत्कटतेने अनुभवणें व तो परिणामकारक पद्धतीने आविष्कृत करणें म्हणजे उत्कृष्ट कलानिर्मिति होय, असें श्री. फडके म्हणतात. भावनेच्या किंवा आविष्कृतीच्या उत्कटतेपलीकडे पाहण्याचें कारण नाही. ' हाच त्याचा चांगलेपणा,हीच त्याची नीतिमत्ता, नीति-अनीतीचा या ठिकाणीं विचार नुसता गौणच नव्हे तर असंबद्ध आहे, असें त्यांचें म्हणणें दिसतें. आतां प्रश्न असा की त्यांच्याच म्हणण्याप्रमाणे या नानाविध जगांत जर ' सद्गुणांचा विलास ' व 'दुर्गुणांचें दर्शन घडत आहे ' तर हे सदगुण व दुर्गुण सद्भावनांचे व असद्भावनांचे आविष्कार असले पाहिजेत आणि हे जर खरें तर असद्गुणांचा म्हणजे दुर्गुणांचा उत्कट अनुभव व त्याचा परिणामकारक आविष्कार उत्कृष्ट कला ठरेल आणि या उत्कृष्ट कलेचा परिणाम समाजावर अनिष्ट होईल. इष्ट होणें शक्य नाही. अनिष्ट परिणाम करणारी एक उत्कृष्ट कला आहे असें प्रोफेसर साहेबांस जगास सांगावयाचें आहे काय ? सद्भावनांच्या आणि असद्भावनांच्या उत्कटतेतून होणाऱ्या आविष्काराने उत्तम सत्कला व उत्तम असत्कला अशा दोन कला निर्माण होतात काय ? कलेला ' असत् ' विशेषण लावलेलें कधी ऐकिवांत नाही. कला ' असत् ' असूं शकते असें म्हणणें कलेला कलंक लावणें आहे. तिचें पावित्र्य घालविणें आहे. म्हणून भावनांच्या व अनुभवांच्या नैतिक मूल्यांकडे कलाकाराने लक्ष देणें इष्टच नव्हे तर अपरिहार्य आहे......

प्राध्यापक म्हणतात,वस्तऱ्याचा चांगुलपणा जसा त्याच्या धारेंत व उत्तम हजामत करण्यांत आहे, त्याच्या सोनेरी मुठींत नाही, त्याप्रमाणे कला तिच्या उत्कट भावनेंत व आविष्कारांत आहे, नीतीच्या सोनेरी मुठींत नाही. एकतर निर्जिवाची उपमा सजीवास अशा प्रसंगीं अप्रयोजक आहे. दुसरें असें, वस्तऱ्याची धार आणि भावनेची उत्कटता ह्यांचें उपमेपुरतें साधर्म्य मानलें तरी वस्तरा किंवा चाकू मारेकऱ्याच्या, कसाबाच्या हातीं आहे की सर्जनाच्या हातीं आहे हें पाहाणें निस्संशय अवश्य आहे. मारेकरी प्राण घेईल, सर्जन प्राण वाचवील. म्हणून साहित्यिकाच्या अनुभवास येणाऱ्या भावना व अनुभव शिव आहेत की अशिव आहेत हें नीतिमूल्यानुरूप ठरविलें पाहिजे. नुसत्या उत्कटतेने, नुसत्या धारेच्या तिखटणावरून ठरविलेलें मोल खोटें ठरेल. उत्तम वस्तरा केस न काढतां गळा कापील. नुसती नाममात्र कला वांझ आहे. तिची प्रेरक शक्ति सद्भावना नसेल तर ती घातक ठरेल. "

प्रा. फडके यांच्या प्रतिपादनाला असें उत्तर देऊन नंतर श्री. बाबासाहेब खापर्डे यांनी कला कलेसाठी नव्हे—तर जीवनासाठी या तत्त्वाची जोरदार तरफदारी केली आहे. ' कला स्वकार्यक्षम व्हाव्या म्हणून त्या त्या कलेचें तंत्र निर्माण झालें. पण तंत्र म्हणजे कला नाही. तंत्र सदोष असूनहि कला उच्च कोटीची असूं शकेल. बिनचुक तंत्रांत हीन कला असूं शकेल. ती जीवनानुकूल नाही. ललित वाङ्मय कलेचा भावना हा प्राण आहे. तंत्राच्या विणेंत गुंफलेले शब्द हा देह आहे.प्राण जर असत् असेल,दूषित असेल, क्षयी असेल तर भरजरी पोशाख ही त्याची विडंबना आहे ...... ललित वाङ्मयाने जे अनुभव उत्कटतेने व्यक्त करावयाचे ते अनुभव

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

जीवनानुकूल व जीवनापलीकडे कांहीं ' बुद्धिग्राह्यं अतींद्रियम् ' असलेल्याचा अंगुलिनिर्देश करीत असेल तरच ती कला. ''

## तळमळ ही काव्याची शक्ति

' कलेकरिता कला ' आणि ' जीवनाकरिता कला ' हा वाद जुनाच आहे. तेव्हा या दोन्ही भाषणांवर भाष्य करण्याची गरजच नाही. तथापि जीवनासाठी आपलें सर्वस्व वेचणाऱ्या संत विनोबांच्या वाणीचें या संबंधांतील अवतरण येथें दिल्याशिवाय राहवत नाही. 'जीवनगंगा' या काव्यसंग्रहाला लिहिलेल्या प्रस्तावनेंत विनोबा म्हणतात. " तळमळ ही काव्याची शक्ति आहे. तळमळीच्या अनेक जाती असतात म्हणून काव्याच्याहि अनेक जाती झाल्या. पण सर्वत्र तळमळीचें स्वरूप एकच असतें, म्हणून तळमळीच्या काव्याचें रसास्वादन, मग तें काव्य कोणत्याही जातीचें असो, त्यांची काव्यरुचि कोणत्याहि जातीची असो, रसिकांना अवश्य करतां येते. कवीची इच्छा कशीहि असली तरी रसिकाला आपल्या हौशीचा अर्थ त्यांतून मिळवितां येतो. भक्तिरसाच्या काव्यांतून शृंगार लाभूं शकतो आणि शृंगाररसाच्या काव्यांतून भक्ताला भक्ति लाभूं शकते...म्हणून मी असें ठरविलें आहे की काव्याचें स्वरूप लिहिणाऱ्याच्या मर्जीवर नसतें, वाचणाऱ्याच्या मर्जीवर असतें. पण लिहिणाऱ्याच्या हातांत एक गोष्ट असते. तो नीरस कविता लिहून वाचकांचा विरस करूं शकतो. ह्याने खुशाल नीरस लिहावें आणि त्याने सरस वाचावें हें साधायचें नाही. ह्याने शृंगारिक लिहूनहि तो भक्तिमय समजूं शकतो. पण ह्याने नीरस लिहूनहि तो सरस समजूं शकत नाही. म्हणून काव्याचें मर्म जाणणाऱ्यांनी रस हा काव्याचा आत्मा मानलेला आहे आणि मला वाटतें त्यांचें तें कथन बरोबर आहे.

पण रस म्हणजे काय?... रस म्हणजे तळमळीचा खरेपणा. म्हणून मी म्हणत असतों खरी तळमळ असूं द्या. मग ती बाह्य विषयवासनेची का असेना. मला ती चालून जाईल. पण ईश्वराच्या नांवाची खोटी तळमळ चालायची नाही. परीस लोखंडाचें सोनें करूं शकतो पण पितळेचें करूं शकत नाही. तुमच्या हीन तळमळीचें रूपांतर मी उच्च तळमळींत करूं शकतों. पण तुमच्या खोटयाचें खरें करण्याचें सामर्थ्य मला नाही. ' नये नेत्रीं जळ । नाही अंतरीं तळमळ । तों हे चावटीचे बोल ' असें जेव्हा तुकाराम म्हणतो तेव्हा त्याला हेंच म्हणायचें आहे. सत्य हें जीवनसार आहे आणि तोच साहित्यरस आहे.

लोक विचारतात, ' कवीचें जीवन पुण्यमय असलें पाहिजे का? ' कुणी ह्याचें आग्रहाने उत्तर देतात ' अवश्य असलें पाहिजे. ' दुसरे म्हणतात, ' तशी कांही गरज नाही.' मला कवीचें पुण्यमय जीवन हवेंच आहे. पण मी ह्या दुसऱ्या पक्षाला दुजोरा द्यायलाहि तयार आहें. मी म्हणतों, कवी पापी का असेना तो खरा पापी असो म्हणजे झालें. चांगला मन लावून पाप करणारा असला पाहिजे. मधून मधून पुण्याचा बुरखा घेणारा, पापाचें ढोंग करणारा नाही चालायचा. खरा निष्ठावान् पापी पाहिजे. तसा असला तर तो वाटल्यास नरकांत जाईल पण त्याच्या काव्याने मी मोक्ष गाठूं शकतों. ''

ग्रीक ट्रॅजेडीज आणि फारसी काव्य, विशेषतः उमरखय्यामचें काव्य यांचे रसज्ञ पंडित श्री. बाबासाहेब खापर्डे यांच्या विचारासाठी त्यांची क्षमा मागून हा उतारा येथे देण्याचें धाडस करतों.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## विदर्भ साहित्य संघाचे नवीन अध्यक्ष

श्री. हरिभाऊ नेने यांच्या आकस्मिक मृत्यूमुळे रिकाम्या झालेल्या अध्यक्षपदावर वि. सा. संघाच्या कार्यकारी मंडळाने श्री. बाबासाहेब खापर्डे यांची नेमणूक केली. या नेमणुकी-पेक्षाहि ती स्वीकारण्यांत श्री. बाबासाहेबांनी संघकार्याच्या दृष्टीने अंतःकरणाचा फार थोरपणा व्यक्त केला. त्याबद्दल आम्ही त्यांचे विशेषत्वाने अभिनंदन करतों. श्री. बाबासाहेबांनी स्वतःच म्हटल्याप्रमाणे वि. सा. संघाशीं त्यांचे संबंध फार घनिष्ठ आहेत. ते ग्रीक, फारशी आणि संस्कृत साहित्याचे मार्मिक पंडित आहेत. कै. दादासाहेब खापर्डे यांची रसिकता आणि वक्तृत्वाचा विनोदी मिष्किलपणा यांचा त्यांच्या ठिकाणीं सुरेख संगम झाला आहे. त्यांच्या सारख्यांनी वि. सा. संघाच्या कार्याला हातभार लावण्याने संघाचें पाऊल पुढेच पडेल अशी आशा करण्यास हरकत नाही. वि. सा. संघाच्या सभासदांनी नवीन वर्षासाठीहि त्यांचीच अध्यक्षपदीं निवड केली आहे, यावरून त्यांच्या लोकप्रियतेची कल्पना करतां येईल. आम्ही अभिनंदनपूर्वक त्यांच्या कारकीर्दीला सुयश चिंतितों.

## वैदिक संस्कृतीचा विकास

गेल्या महिन्यांत घडलेली आणखी एक महत्त्वाची घटना म्हणजे भारत सरकारकडून, मराठी भाषेंतील सर्वोत्कृष्ट ग्रंथ म्हणून महाराष्ट्र साहित्य संमेलनाध्यक्ष व परिषदध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या 'वैदिक संस्कृतीचा विकास' या ग्रंथाला दिलेलें पांच हजार रुपयांचें पारितोषिक ही होय. शास्त्रीबुवांचा हा ग्रंथ म्हणजे पुणे विद्यापीठांत इचलकरंजीकर व्याख्यान-मालेंत १९४९ सालीं त्यांनी दिलेलीं व्याख्यानें होत. वैदिक संस्कृति हीच खरी भारतीय संस्कृति कशी आहे याचें अत्यंत सोपपत्तिक विवेचन या व्याख्यानांत केलेलें असून त्यांत शास्त्रीबुवांचा सूक्ष्म व्यासंग, कल्पकता आणि दृष्टिकोनाची विशालता हीं उत्तम प्रतिबिंबित झालीं आहेत. अशा विचारप्रधान ग्रंथाला सर्वोत्कृष्ट पारितोषिक मिळाल्याने सध्याच्या मराठी साहित्यांतील ललित वाङ्मयाच्या ग्रंथापेक्षा शास्त्रीय स्वरूपाच्या वैचारिक ग्रंथाची श्रेष्ठताच एका दृष्टीने प्रस्थापित झाली आहे. इतर भाषांतील ज्या ग्रंथांना पारितोषिकें मिळालीं आहेत ते बहुतेक ललितवाङ्मयाचे ग्रंथ आहेत. या गोष्टीचा आमच्या ललित-लेखकांनी अंतर्मुख होऊन विचार करावा. श्री. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचें, त्यांच्या या गौरवाबद्दल आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतों.

## शेवटीं—

गेलीं तीन वर्षे महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचें संपादन यथाशक्ति करण्याचा प्रयत्न केला. महाराष्ट्र साहित्य परिषदेची कचेरी पुणें येथे असल्यामुळे पत्रिकेचें संपादन पुणें येथेच होणें सोयीस्कर होतें. अशा परिस्थितींत बाहेरच्या सभासदांची या स्थानीं योजना करून कार्यकारी मंडळाने दृष्टीचा विशालपणा व्यक्त केला त्याबद्दल त्याचें अभिनंदन करणें आणि ही जबाबदारी माझ्या अंगावर टाकल्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करणें मी माझें कर्तव्यकर्म समजतों. नागपूर येथें राहून हें काम पार पाडणें खरोखरच फार कठीण होतें. पण संपादक मंडळांतील सर्व सभासदांचें सौजन्य, पुणें येथील कार्यालयांतील सर्व अधिकारी व्यक्ति आणि मुद्रणालयाचे मालक या सर्वांनी मनःपूर्वक दिलेलें सहकार्य यांच्या बळावर मी हें काम पार पाडण्याचा

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रयत्न केला आहे. तो कितपत साधला हें परिषदेच्या सभासदांनी ठरवावयाचें आहे. त्याबद्दल मी स्वतः कांहींहि लिहिणें उचित होणार नाहीं.

वरील अधिकारी व्यक्तींबरोबरच पत्रिकेच्या लेखकांचा व कवींचाहि कृतज्ञतापूर्वक उल्लेख अवश्य केला पाहिजे. किंबहुना पत्रिकेचें यश म्हणजे त्यांतील लेखकांचेंच यश होय. पत्रिकेच्या ध्येय-धोरणाला अनुरूप असे लेख मिळविणें-लिहवून घेणें-किती कठीण काम आहे याची जाणत्यांना कल्पनाच येईलच. पण मला याहि बाबतींत लेखकमित्रांकडून अपूर्व सौजन्याचाच अनुभव आला, एवढेंच येथे लिहितों. कवी, लेखक, परीक्षण-लेखक या सर्वांचा मी अत्यंत ऋणी आहे. पत्रिकेचें संपादन करीत असतांना अभावितपणें झालेल्या दोषांबद्दल सर्वांनी क्षमा करावी एवढी प्रार्थना करून सर्वांचा ' राम राम ' घेतों. असाच कृपालोभ निरंतर असूं द्यावा ही विनंती.

---

# नवीन सभासद

### तहहयात

१ श्री. बा. ह. परांजपे, पुणें ६.
२ डॉ. प्र. न. जोशी, पुणें २.

### साधारण

१ श्री. ना. ग. जोशी, शिरूर ( पुणें ).
२ श्री. वि. रा. पुराणिक, कल्याण, ( ठाणें ).
३ श्री. दादा पठाण, शिरपूर ( प. खा. ).
४ प्रि. वाय्. एस्. महाजन, जळगांव ( पू. खा. ).
५ श्री. गं. गो. विनिवाले, सांगली.
६ श्री. बा. मा. हराळे, भवानीनगर ( द. सातारा ).
७ श्री. प्र. वि. बेंद्रे, अमळनेर ( पू. खा. )
८ श्री. स. कृ. पाध्ये, पुणें २.
९ श्री. वि. प. चितळे, पुणें २.
१० श्री. इनास फर्नांडीस, बेळगांव.
११ प्रा. रा. व. माढेकर, हैद्राबाद.
१२ श्री. चं. दि. पाटकर, जैतापूर ( रत्नागिरी ).
१३ श्री. द. वि. निरंतर, रावळगांव ( नाशिक ).
१४ मो. ल. कुलकर्णी, रावळगांव (नाशिक ).
१५ श्री. हि. बा. शहा, रावळगांव(नाशिक).
१६ श्री. रा. म. गाजरे, धुळें ( प. खा. ).
१७ श्री. नलिनी हिंमतलाल शहा, संगमनेर ( अहमदाबाद )

---



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# साभार–स्वीकार

१. महाराष्ट्र भाषेचें व्याकरण—जगन्नाथशास्त्री क्रमवंत, गंगाधरशास्त्री फडके, बाळशास्त्री घगवे:–संपा. अ. का. प्रियोळकर प्रका–मराठी संशोधन मंडळ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मुंबई २. मूल्य ४ रु.

२. Gramatic Marastta—By–A. K. Priolkar, Price Rs.2

३. कन्नड–प्रबोध —ले. शं. वि. जोशी, प्रका:—रा. ग. जोशी, दि स्टुडंट्स ओन बुक डेपो, धारवाड, मूल्य ३८= रु.

४. पाढे—ले. प्रका:—वि. ग. ताम्हनकर, शास्त्री हॉल, मुंबई, मूल्य २ आणे.

५. महायोगिनी—( अक्क महादेवी )–ले. जयदेवीताई लिगाडे प्रका :— कन्नडकोटी प्रकाशन, सोलापूर मूल्य १ रु.

६. पार्वतीचं मोह्तीर व इतर कविता—ले. श्रीराम अत्तरदे प्रका. शिवाजी ज्ञानप्रकाशन, स्टेशन रस्ता, अमरावती(म.प्र.) मूल्य १॥ रु.

७. अत्तरदाणी (कविता)—ले. श्रीराम अत्तरदे, प्रका–श्रीराम अत्तरदे,शिवाजी कॉलेज, अमरावती ( म. प्र. ) मूल्य ३ रु.

८. चितेच्या प्रकाशांत ( कविता )–ले. श्रीराम अत्तरदे प्रका–श्रीशिवाजी ज्ञान-प्रकाशन अमरावती मूल्य २ रु.

९. सं. चालढकल ( नाटक )--श्रीराम अत्तरदे प्रका–श्रीशिवाजी ज्ञानप्रकाशन, अम-रावती, मूल्य १॥ रु.

१० म. फुले आणि सत्यशोधक चळवळ ले. मा. प. मंगुडकर, प्रका–स. मा. गर्गे, स्पेशल बुक स्टॉल, फर्ग्युसन रोड, पुणे ४. मूल्य १२ आणे.

११ चवथिचो चंद्र ( नाटक )–ले. रा. शं. नायक प्रका–का. श्री. नायक, गोमंतक छापखाना, रामचंद्र बिल्डिंग बी२–३ गिरगांव मुंबई ४ मूल्य ८ आणे.

१२ हिम अङ्गार (कविता)–ले. प्रका.–रा. अ. काळेले, ३६ हमारी कॉलनी, इंदूर (म. भा.)

१३ मृद्‌गंध (कविता)–ले. विंदा करंदी-कर, प्रका–पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७. मूल्य ३ रु.

१४ कक्षा (नाटक)–ले. तारा वनारसे प्रका-पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७, मूल्य १॥ रु. के. भि. ढवळे, समर्थ सदन, गिरगांव मुंबई प्रकाशनें:—

१५. आज खायला काय आहे ? संपादिका–सौ. नलिनी डहाणूकर, सौ. लीला मस्तकार रेळे, मूल्य १। रु.

१६. ताई अन् भाऊ–ले. अमरेन्द्र गाडगीळ, मूल्य १। रु.

१७. तीन पिढ्यांचा दाजी–ना. रा. रानडे, मूल्य १० आणे.

१८. ५७ ची सत्यकथा–वि. वा. हडप, मूल्य १॥ रु.

१९. जयजयवन्ती ( कविता ) स. अ. शुक्ल, मूल्य २॥ रु.

२०. अ आ—संपादक राज थापड व रेचल ग्रेनफेल. मूल्य १। रु.

२१. मराठी रियासत—( ६ छत्रपती रामराजा, ४ निग्राहक माधवराव ) ले. गो. स. सरदेसाई मूल्य ३।) रु.

२२. डॉ. केतकरांच्या कादंबऱ्या—ले. द. न. गोखले, प्रका:–व्हीनस प्रकाशन ४१० शनिवार पुणे २, मूल्य २।।।≈.

२३. तुमचा विमा—ले. ज. रा. जोशी, प्रका–नवीन किताबखाना, पुणे २, मूल्य २. रु.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

